# प्रस्तावना

॥ वन्दे फणिफणमण्डितदेहं पार्श्वं निजहितगतसंदेहम् ।

मगध देशातील बिंबिसार-अशोकादि चक्रवर्तींपासून तों आंध्र, कर्नाटक व गुजरातेतील कुमारपालपर्यंतच्या जैन राजेमहाराजांनीं विदर्भ, महाराष्ट्र व कोंकण देशावर इ. स. पूर्वी पाचव्या शतकापासून इ. स. नंतर बाराव्या शतकापर्यंत अधूनमधून राज्यें केलीं. तेव्हां अर्थात्‌च महाराष्ट्रात जैन वस्ती व मंदिरें अगणित असलीं पाहिजेत व जैनवाङ्मयही विपुल असलें पाहिजे. पण दुर्दैवाची गोष्ट ही कीं डोंगरातील कांहीं लेण्यांशिवाय बृहन्महाराष्ट्रात जैन संस्कृतीचें नाव घेण्याजोगें दुसरें नावनिशाणहि उरलेलें नाहीं. नाहीं म्हणावयास बडोद्यास भरलेल्या श्वेतांबर कान्फरन्सच्या अधिवेशनात लो टिळकांनीं केलेल्या आपल्या भाषणात म्हटल्याप्रमाणें 'दक्षिणेंतील व गुजरातेंतील ब्राह्मण निरामिष आहेत हा जैन राज्यात ब्राह्मणावर झालेला परिणामच असल्यामुळें हा एक अप्रत्यक्ष जैन अवशेषच म्हणावयास हरकत नाहीं. लिंगायत, वारकरी व महानुभाव या पंथांच्या तत्त्वज्ञानावर व धर्माचारावर जैन संस्कृतीची छाप पडलेली उघड दिसत असल्यामुळें हाहीं जैन संस्कृतीचाच एक अवशेष म्हणता येईल'.

सुदैवानें कित्येक कर्नाटकी, मारवाडी व गुजराती जैन गेल्या कांहीं शतकापासून बृहन्महाराष्ट्रात व्यापारी व जमीनदार म्हणून राहात आले आहेत. त्यांच्या वास्तव्यामुळें महाराष्ट्रात ठिकठिकाणीं जिनालयें दिसून येत आहेत व कांहीं ठिकाणीं प्राचीन ग्रंथसंग्रहही त्यांनीं केलेला आहे. महाराष्ट्रात जो जीवदयेचा प्रचार होत आहे त्याचें श्रेय जैन लोकांनाच आहे. मराठी वाङ्मयात कोल्हापूर व सोलापूरकडील जैनांनीं थोडीशी भर टाकली आहे. तरीपण त्या दृष्टीनें व्हावें तसें कार्य अजून मुळींच झालें नाहीं ही गोष्ट कोणालाही कबूल करावी लागेल. तरुण पिढींत या दृष्टीनें अधिक उत्साह दिसत आहे व महाराष्ट्र जैन-साहित्य-प्रकाशन समिति ही संस्था या वाढत्या जागृतीचेंच प्रत्यंतर होय.

वरील समितीतर्फे हें जे प्रथम प्रकाशन प्रसिद्ध होत आहे त्यात अमदाबादचे नगरशेट शांतिदास, जगद्गुरु श्रीहीरविजयसूरि व तीर्थंकर प्रभु पार्श्वनाथ, ह्या तीन प्रभावी महापुरुषांची रोचक चरित्रें देण्यात बरेंच औचित्य दाखविलें गेलें आहे. सर्वच तीर्थंकरांनी जैन धर्माची प्रभावना जास्तीत जास्त केली हें उघडच आहे; तरी पण श्रीपार्श्वनाथ तीर्थंकराच्या नावानें बरीच अधिक प्रभावना झाली ही गोष्ट हिन्दुस्तानभर त्यांचींच मंदिरें अधिक आहेत यावरून प्रत्यक्षच दिसत आहे. तीर्थंकराचे खालोखाल धर्मप्रभावना जैनाचार्य करतात, व अर्वाचीन काळात श्रीहीरविजयसूरींनी या बाबतीत अप्रतिम कार्य केलें आहे ही गोष्ट इतिहासप्रसिद्धच आहे. जिनशासनप्रेमी श्रावक धर्मप्रभावनेचें कार्य कसें उत्कृष्टपणें करूं शकतो याचें नमुनेदार उदाहरण म्हणजे शांतिदासशेट होत. तेव्हां धर्मवीर नगरशेठ शांतिदास, अकबरप्रतिबोधक जगद्गुरु श्रीहीरविजयसूरि व प्रकटप्रभावी तीर्थेन्द्र प्रभु पार्श्वनाथ यांच्या चरित्राचें संकलन ह्या ग्रंथात केल्याबद्दल लेखक अभिनंदनास पात्र आहेत.

कौरव-पांडवांच्या भारतीय महायुद्धानंतरची प्रतिक्रिया म्हणून प्रभु पार्श्वनाथ अवतरले व त्यांचें नाव अखिल भरतखंडात अहिंसा, संयम, तप, शांति, संतोष व सदुद्यम या गुणांचा प्रसार करण्यास शतकानुशतकें कारणीभूत होत आलें असल्यामुळें वैदिकांनाही त्यांचें समग्र चरित्र अभ्यासणें आवश्यक आहे. त्यांच्या चरित्राचे बाबतीत दिगंबर व श्वेतांबर कथनात कांहीं फरक असला तरी तेवढ्यानें पूज्यतेंत फरक येऊं देणें बरें नाहीं व येतही नाहीं. जैनाचार्य हीरविजयसूरींनी आपल्या तत्त्वनिष्ठेनें, निर्भीड प्रवचनानें व तपःसिद्धीनें अकबर बादशहासारख्या चिकित्सकावरही इतकी छाप पाडली कीं त्यानेंच सूरींना जगद्गुरु ही पदवी दिली व त्यांच्या आज्ञेनुसार स्वतः काहीं जैन व्रतें घेतलीं. शत्रुंजयादि तीर्थांना अपाय न पोहोंचूं देण्याबद्दलही फर्मानें काढलीं व काहीं तिथींना कत्तल बंद करण्याचेही हुकूम सोडले. या कामगिरीनें श्वेतांबरांना तर सूरींनी कायमचें ऋणी करून ठेवलेंच आहे पण दिगंबरांनाही ह्याबद्दल अभिमान वाटणें स्वाभाविक आहे. एवढेंच नव्हे तर सर्व हिंदु समाजालाही मुसलमान बादशहाला नमविणाऱ्या जगद्गुरूमुळें आपला गौरव झाला असेंच वाटणार हें उघड आहे.

नगरशेट शांतिदासाच्या धर्मप्रेमाबद्दल, त्यागाबद्दल, कलाकौशल्याबद्दल व व्यवहारचातुर्याबद्दल त्यांचे जेवढे गोडवे गावेत तेवढे थोडेच आहेत. आपल्या आयुष्यात त्यांनी अकबर तो औरंगजेबापर्यंतचे चार बादशहा पाहिले व जन्हेरीमम्मा म्हणवून घेण्याइतक्या घरोब्यापासून तो मंदिराची मशीद झालेली पाहण्यापर्यंतचे उन्हाळेपावसाळेहि त्यांनी अनुभवले. बादशहांना वेळोवेळी त्यांनी कर्जे दिली, जडजवाहीर देऊन खुशी केले व अकबराबर रुसलेल्या बेगमचा भगिनी म्हणून पाहुणचारही केला. तरी पण औरंगजेबाने सुभेदारी गाजवून मंदिराची मशीद बनविलीच. एकदा झालेली मशीद ती कायमचीच मशीद हा कडवा कायदाही शहाजहाननें तोडला. पण एकदा गाईचें रक्त सांडले म्हणून कलासपन्न व विशाल जिनमंदिरही कायमचेच भ्रष्ट मानण्याचा हट्ट मात्र सनातन्यांनी सोडला नाहीं. यावरून इतरांच्या उपसर्गापेक्षा आपलेच दुराग्रह हिंदुसमाजाला कसे नडत आले आहेत हें स्पष्ट दिसून येते. असो.

आपल्या गुणांचा व उपयोगाचा मोबदला म्हणून धर्मवीर शांतिदासशेटनीं स्वतःसाठीं किंवा घराण्यासाठीं काहींही न मागता तीर्थरक्षणासाठींच फर्मानें घेतलीं ही त्यांची धर्मभक्ति सर्वस्वी वाखाणण्याजोगी व अनुकरणीय अशीच आहे. अकबरानें पालख्या मेणे पाठविले तरी आपलें पादचारी व्रत श्रीहीरविजयसूरींनीं सोडलें नाहीं ही त्यांची धर्मनिष्ठा त्यांना व समाजालाही हितकारकच झाली. तात्पर्य, वरील तिन्ही चरित्रें सर्व वाचकांना उद्बोधक होतील अशींच आहेत यांत शंका नाहीं.

तीर्थंकरासारख्या अलौकिक व्यक्तींचे चरित्र लिहिणे अनेक दृष्टींनी कठिणच आहे. म्हणूनच सांप्रदायिक पद्धतीनें लिहिलेल्या चरित्रांशिवाय अधिक ग्रंथ तीर्थंकरांच्या चरित्रावर झालेले आढळत नाहींत. काहीं कवींनीं आपली काव्यशक्ति दाखविण्यासाठीं तीर्थंकरचरित्रें लिहिलीं आहेत व अलिकडे ऐतिहासिक दृष्टीनें तीर्थंकरचरित्रें लिहिण्याचा प्रयत्न होत आहे. पण लहानथोरांना सर्वसामान्यपणें व ऐतिहासिक दृष्टीनें तीर्थंकरांच्या जीवनाचा परिचय करून देणें एवढाच साधा हेतु प्रस्तुत ग्रंथाचा असणार. त्या दृष्टीनेंच या ग्रंथाकडे पाहून जुन्या दृष्टीची जैन मंडळी या प्रयत्नावर टीका न करतील तर बरें. कारण श्री. कांतिलाल शहांनीं अमळनेरहून

विद्यार्थिदशेंत लिहिलेलें लहानसें महावीरचरित्रहि जैनजैनेतर जनतेंत जैनविषयक ज्ञानप्रसाराच्या दृष्टीनें बरेंच उपयुक्त ठरलें आहे. श्रीहीरविजयसूरि व नगरशेठ शांतिदास यांच्या चरित्रांचें लिखाण उत्कृष्ट साधलें आहे ही गोष्ट वाचकांना दिसून यईलच. प्राचीन काळीं कऱ्हाड, कोल्हापूर, मान्यखेड, पैठण, देवगिरी, नाशिक वगैरे ठिकाणीं वसून पंडितांनीं जैन ग्रंथरचना त्या महाराष्ट्रांत निर्माण केली त्या महाराष्ट्रांत जसे व जितके जैनग्रंथ निर्माण होतील तितके आवश्यकच आहेत ही गोष्ट लक्षांत घेऊन या समितीचे हे ग्रंथप्रकाशनाचे प्रयत्न सर्वांना पुरस्करणीय आहेत. युरोपियन पंडितांनीं बौद्धवाङ्मयात लक्ष घातलें म्हणून हिंदी विद्वानांनींही बौद्धवाङ्मयाकडे युरोपियन दृष्टीनेंच लक्ष दिलें. जैनवाङ्मयाच्या बाबतींतही तीच चूक घडत आहे आणि लक्षही कमीच दिलें जात आहे. खरें पाहतां बौद्धासारख्या एकांतिक मतापेक्षां जैनासारख्या सार्वांगिक व हिंदु धर्माला मूलभूत असलेल्या जैनसंस्कृतीचा अभ्यास सर्व विद्वानांनीं अधिक केला पाहिजे. पण परप्रत्ययनेयबुद्धि असल्यामुळें तसें घडत नाहीं ही दुःखाची गोष्ट आहे. जैनसंस्कृतीचा जितका अधिक अभ्यास होईल तितका अधिक प्रकाश हिन्दुसंस्कृतीच्या निरनिराळ्या अंगावर पडणार आहे. म्हणून जैनविषयक कोणत्याही ग्रंथप्रकाशनास प्रोत्साहन देणें कर्तव्य आहे. ह्या दृष्टीनें मी या समितीची भरभराट इच्छितों.

पुणें, ता. २५।११।४२

लक्ष्मण रघुनाथ भिडे



दानवीर शेठ दलीचंदजी पुनमचंदजी आचळया
चांदवड

# प्रकाशकाचें निवेदन

महाराष्ट्र जैन साहित्य प्रकाशन समितीचें प्रथम प्रकाशन 'भारतीय प्रभावी पुरुष' महाराष्ट्रीयांच्या सेवेस सादर करताना आम्हास अत्यंत आनंद होत आहे.

ह्या प्रकाशनसमितीची स्थापना याच वर्षी जुलै महिन्यात चांदवड येथें झाली. समितीचा उद्देश जैन संस्कृतीचा इतिहास, तत्त्वज्ञान वगैरे साहित्य मराठींत आधुनिक पद्धतीनें लिहून पुस्तकांच्या द्वारें प्रसिद्ध करण्याचा आहे. भारतीयांचा गौरवशाली इतिहास व संस्कृति घडविण्यांत जैनांचा फार मोठा हिस्सा आहे. असें असूनही जैनांच्या प्रभावशाली पुरुषांना भारतीय इतिहासात योग्य स्थान दिलें गेलें नाहीं याचें कारण युरोपियन इतिहाससंशोधकांनीं त्यांत प्रथम विशेष लक्ष घातलें नाहीं व तोच कित्ता पौर्वात्य विद्वानांनीं गिरविला हेंच होय.

भरतवर्षात जैन राजांनीं आसेतुहिमाचल राज्य केलेलें आहे. तसेंच जैन साधु, कवि व वीरांनीं भारताचा सर्वांगीण उत्कर्ष करण्यात महत्त्वाचा भाग घेतला आहे. त्यांनीं केलेली कामगिरी केवळ जैन दृष्टीची नसून समस्त राष्ट्र अगर मानवसमाजाच्या कल्याणाच्या विशाल दृष्टीची होती असें असून या थोर पुरुषांकडे दुर्लक्ष केलें गेलें आहे. आताशा कोठें त्यांच्याकडे विद्वानांचें लक्ष जात चाललें आहे.

महाराष्ट्राचा आणि जैनांचा संबंध अति प्राचीन आहे. महाराष्ट्रावर अनेक जैन राजांनीं राज्यें केलेलीं आहेत. अनेक प्रभावी पवित्र साधूंनीं महाराष्ट्रीय जनतेस उपदेशामृत पाजून महाराष्ट्रीय संस्कृति घडविलेली आहे. ब्राह्मणापासून तो अस्पृश्यापर्यंत सर्व प्रकारचे जातींचा जैनांत समावेश आहे. खेडोपाडीं जैनांची वस्ती अजूनही मुबलक आहे. त्यामुळें जैनांचा इतिहास, साहित्य व तत्त्वज्ञान यांची ओळख महाराष्ट्रीयांस असणें आवश्यक आहे.

महाराष्ट्रातील जैनांना तर या गोष्टींचें ज्ञान असणें त्यांचें परम कर्तव्य आहे. ज्या समाजास आपली उन्नति साधावयाची असेल त्या समाजानें

आपल्या भूतकाळाची अवगणना करता कामा नये. भिन्न भिन्न दृष्टिकोनांनें मागील घडामोडींचें निरीक्षण झालें पाहिजे आणि त्यामधून निष्पन्न झालेल्या विचारांना आचारात ठेविल्याशिवाय गुडराच नाहीं हें पक्कें समजावें वर्तमानकाळात उच्च कोटीस पोहोंचलेल्या कोणत्याही प्रजेचें उदाहरण घेतलें, त्याची उन्नति कशी झाली याबद्दल खोल विचार केला, तर आपणास असें दिसून येईल कीं त्या त्या प्रजेतील विचारवतांनीं आपल्या पूर्वजांच्या कामगिरीचें सर्वग्राही ज्ञान आपल्या लोकांस करून दिलें होतें. इतिहास हें स्फूर्तीचें व प्रगतीचें साधन आहे, संस्कार व संस्कृतीचें प्रेरणाबळ आहे, हें समजून महाराष्ट्रीय जैनांनीं ह्या समितीच्या प्रकाशनाला पुरस्कार केला पाहिजे

महापुरुष ही अखिल मानवसमाजाची मिळकत आहे अशी समितीची विचारप्रणाली असल्यानें त्यात सप्रदायादि भेदाची दृष्टि ठेवली जाणार नाहीं

वाचकात केवळ रसिकवृत्ति उत्पन्न होण्यासाठीं कल्पनातरंगानीं रगलेल्या नवलकथा प्रसिद्ध करण्याचा समितीचा मुळींच उद्देश नाहीं. त्यामुळें सत्यशोधनास साजेल अशा ऐतिहासिक शुद्धतेच्या पायावरच समितीचीं सर्व चरित्रें प्रसिद्ध करण्यात येतील कारण इतिहास हा जगताचा आरसा आहे तो नेहमीं शुद्ध आणि यथार्थ स्वरूपात राहिला पाहिजे त्या दृष्टीनेंच हें प्रकाशन असून यापुढील प्रकाशनेंही अशाच रीतीनें प्रसिद्ध होतील.

**१ धर्मवीर शान्तिदास** (ले. शान्तिलाल खेमचद शाह)— हें चरित्र पाश्चिमात्य प्रवाशांचीं प्रवासवर्णनें, रासमाळा, काव्यप्रशस्ति, गुजरातचा इतिहास आदि साहित्यास ऐतिहासिक कसोटीवर चढवून कराचीचे सुप्रसिद्ध जैनेतर इतिहाससंशोधक श्री डोंगरसी धरमसी संपट ह्यानीं संपादिलेल्या 'प्रतापी पूर्वजो' ह्या चरित्राचे आधारावर लिहिलें आहे.

**२ अकबरप्रतिबोधक जगद्गुरु हीरविजयसूरि** (ले. रसिकलाल दामोदरदास मेहेता, बी ए)— हें चरित्र इतिहासप्रेमी विद्वान् मुनिराज विद्याविजयजी यानीं मोंगलकालीन सनदा, फर्मानें, आज्ञापत्रें, तवारिखा, ऐने अकबरीसारखे तत्कालिन लेखकांचे प्रमाणित ग्रंथ आणि परदेशी

प्रवासी व इतिहासकाराच्या साहित्याचें संशोधन करून लिहिलेल्या 'सूरीश्वर अने सम्राट्' ह्या ग्रंथाच्या आधारानें लिहिलें आहे.

**३ भगवान् पार्श्वनाथ** (ले. शांतिलाल खेमचंद शाह)— ह्या अलौकिक तीर्थंकराचें चरित्र प्राचीन ग्रंथाच्या आधारें लिहिलेलें आहे. तीर्थंकराचें जीवन म्हणचे त्याच्या त्यापूर्वीच्या जन्माचें परिणत स्वरूप होय. ह्या चारित्राला ब्रह्मगिरीच्या हत्तीगुंफेच्या शिलालेखाचा आणि मथुरेच्या कंकाली-टीलेच्या खोदकामात सापडलेल्या शिल्पशिलालेखाचाही आधार आहे.

कागद दुर्मिळ झाला असताही कार्याचें महत्त्व जाणून आम्ही हें प्रकाशनकार्य चालू ठेवण्याचें धाडस करीत आहोंत. वाचक त्याचा योग्य पुरस्कार करतील अशी आशा आहे.

'धर्मवीर शांतिदास' ह्या चरित्राचें हस्तलिखित श्री. कृ. मा. वीरकर, एम्. ए., श्री. श्री. दा. मालेराव, बी. ए., यांनीं अत्यंत आपुलकीनें तपासून दिलें. त्याप्रमाणेच वरील तिन्ही चरित्रें श्री. के. ह. आवड, श्री. ल. र. भिडे, श्री. बा. दि. चादवडकर यानीं आपुलकीनें तपासलीं व त्यावर उपयुक्त सूचना दिल्या. छपाईसाठीं पुण्याचे श्री. केसरचंदजी ललवाणी यानीं चांगलाच सहकार दिला. चांदवड गुरुकुलाच्या छात्रानीं रात्रींबिरात्रीं जागून त्याच्या नकला करून दिल्या. ह्याबद्दल ह्या सर्वांची समिति अत्यंत आभारी आहे.

शेवटीं ज्याच्या आर्थिक साहाय्यानें हें काम सुकर झालें ते श्री. दलीचंदजी पुनमचंदजी आचळ्या याचा आणि चरित्राना आधारभूत असलेल्या ग्रंथाचे लेखक, प्रकाशक आणि चित्रकार याचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख करून हें निवेदन संपवितों.

---

# दान. श्री. दलीचंदजी पुनमचंदजी आचळ्या यांचा संक्षिप्त जीवनवृत्तान्त

श्रीमान् पुनमचंदजी शेठ आचळ्या हे चांदवड येथील एक रहिवासी असून यांचें किराण्या मालाचें दुकान होतें. त्यांची परिस्थिति अत्यंत गरिबीची परंतु स्वभाव आनंदित, करारी आणि बाणेदार होता. यांचें लग्न पाथरी (सिन्नर) गांवीं झालें पत्नीचें नांव छगनाबाई होतें. यांना शेपमलजी, हरकचंदजी, हजारीमलजी, दलीचंदजी, किसनदासजी असे पांच मुलगे आणि रामीबाई, रमाबाई व तिनीबाई अशा तीन मुली झाल्या. पैकीं श्री. दलीचंदजी आचळ्या यांचा जन्म शके १८०२ मध्यें झाला. घरची अत्यंत गरिबी असल्यामुळें पांचही भावांचें शिक्षण यथातथाच झालें. पैकीं सर्वांत लहान असलेले श्री. दलीचंदजी व श्री. किसनदासजी हे दोघे भाऊ व्यवहारकुशल व तरल बुद्धीचे असल्यामुळें वेगळे निघाले. जवळ खर्चा-वयास कांहींच नसल्यामुळें निव्वळ डाळ मुरमुरे खाऊन यांनीं आठ दिवस काढले आणि नंतर ते लासलगांवीं नोकरीस राहिले. परंतु त्यांत श्री. दलीचंदजी हे वडील असूनही त्यास रु. २०० व श्री. किसनदासजी यास रु. ३०० वार्षिक पगार असल्यामुळें दलीचंदजींना तें लांछनास्पद वाटू लागलें आणि म्हणून नोकरी न करतां घरीं निघून जाण्याविषयीं त्यांनीं किसनदासजी यांचा सल्ला घेतला. दोघांचें एकमत होऊन पुन्हा दोघे भाऊ चांदवडला आले आणि लासलगांव येथील श्रीमान् अगरचंदजी नाहटा यांचे मार्फत वशिला लावून श्रीमान् शेठ दगडूराम उमाजी यांच्याकडून रु. ५० भांडवलासाठीं कर्जाऊ काढले. लहानशा दुकानापासून व्यापाराची त्यांनीं सुरुवात केली. पण दोन तीन वर्षें दुकान चाललें असेल नसेल तोंच प्लेगानें कहर उडविला त्यांत पंधरा दिवसांतच श्री. हजारीमलजी व शेपमलजी हे दोघे वडील भाऊ व त्यांचे वडील श्री पुनमचंदजी असे तिघेही स्वर्गवासी झाले. श्री. हरकचंदजी व हजारीमलजी यांच्या पत्नी यापूर्वींच निवर्तलेल्या होत्या. अशा प्रकारें चोहोंकडूनच आकाश कोसळल्यामुळें त्यांना

मातावल्याप्रमाणेंच झालें. स्वर्गस्थ झालेल्या दोघा मावाच्या धर्मपत्नी श्रीमती सीताबाई व जडावबाई यास आपल्यांत घेऊन पुन्हा यानीं पूर्ववत् किराण्या मालाचा व्यापार चालू केला व अविश्रान्त परिश्रम करून दुकान अल्पावधींत भरभराटीस आणलें. शके १८२५ मध्यें स्वर्गस्थ झालेल्या दोघा वडील मावाचा व वडिलाचा त्यानीं मोसर दिवस केला. आणि लवकरच किसनदासजींचें श्री. कल्याणमलजी चोरडे, धारणगावकर, यांची मुलगी फुलाबाई हिच्याशीं त्याचें लग्न झालें. शके १८२९ मध्यें श्री. दलीचंदजी याचें लग्न इगतपुरी येथील श्री. जुगराजजी टाटिया याचे मुलीशीं झालें. मुलीचें नाव सीताबाई होतें. श्री. किसनदासजी यास पाच मुलें असून त्याचीं नावें अनुक्रमें (१) श्री. रतनलालजी ऊर्फ बाबूशेठ, (२) श्री. माणकलालजी, (३) श्री. हिरालालजी, (४) श्री. गुलाबचंदजी (मयत), व (५) शातीलालजी अशीं आहेत. तसेंच श्रीमान् दलीचंदजी यास चार मुलगे व एक मुलगी असून त्याचीं नावें अनुक्रमें (१) श्री. झुंबरलालजी, (२) मोतीलालजी, (३) लालचंदजी, (४) ताराचंदजी, व सदाकुंवरबाई अशीं आहेत. फक्त कुमार ताराचंदजीखेरीज सर्व विवाहित आहेत. शके १८४५ मध्यें श्री. दलीचदजी व किसनदासजी वेगवेगळे झाले. आणि नंतर लवकरच श्री. दलीचदजी याच्या पत्नी श्री. सौ. सीताबाई या निवर्तल्या. शके १८५२ मध्यें श्री. किसनदासजी हेही निवर्तले. हे ह्यात परंतु आजारी असतानाच चादवड येथें श्री. नयणसुखलालजी पारसवणी याचे अध्यक्षतेखालीं स्थानिक सभा होऊन त्यात सामाजिक सुधारणेच्या दृष्टीनें अत्यंत महत्वाचे ठराव मंजूर झाले. त्यातच मोसर न करण्याविषयींचा ठराव होता. सभेच्या कामाची हकीगत ऐकून श्री. किसन दासजी यास कल्पनातीत आनद झाला व त्यानीं आपल्यामागें आपला मोसर मुळींच न करण्याविषयीं इच्छा प्रदर्शित केली. त्याची नोंद सदरचे ठराव छापून प्रसिद्ध करण्यात आले त्यात घेतलेली आहे. अशा प्रकारें तेव्हापासून चादवड येथें मोसरची प्रथा नाहींशी होण्यास सक्रिय पाठिंबा स्वर्गस्थ श्री. किसनदासजी व त्याचे कुटुंबीजन यानीं दिला असून वडिलाचे स्मरणार्थ श्री. बाबूशेट यानीं रु. ३०१ देऊन श्री. नेमिनाथ-ब्रह्मचर्याश्रमाचे वसतिगृहात एक खोली बाधून दिली आहे. श्रीमान् दली-

चंदजी यांनीं आतापावेतों खालीलप्रमाणें सार्वजनिक कार्यास देणग्या देऊन स्वस्वार्जित संपत्तीचा सदुपयोग केला.

१००० यात्रिकलोकांना व गरीब अपंग लोकांना धान्यादीच्या रूपानें मदत आणि गुरांना चारा घालणें व गुरें सोडविणें यासाठीं वेगवेगळ्या स्थानीं खर्च केले.

६०२ श्री. नेमिनाथ ब्रह्मचर्याश्रमामध्यें पूज्य पिताजींच्या व स्वतःच्या नांवानें दोन खोल्या आश्रमाचे वसतिगृहांत बांधून दिल्या.

२४० चार वर्षेपर्यंत कार्तिकी शु १५च्या दिवशीं दरसाल स्वामिवात्सल्यासाठीं रु. ६० प्रमाणें दिले.

१७५० एक स्वतंत्र वसतिगृह बांधण्यासाठीं श्री. नेमिनाथ ब्रह्मचर्याश्रमाला रोख दिले.

१००० जैन स्थानक बांधण्यासाठीं चांदवड येथील पंचास दिले.

२०० लासलगांव येथें गुप्तदान दिलें.

३०० चांदवड येथें गुप्तदान दिलें.

२०० जीर्ण मंदिरास व लोकांना पिण्यासाठीं पाण्याचे टाकीसाठीं खर्च केले

३०० श्रीमहाराष्ट्र जैन साहित्य प्रकाशन समिति, चांदवड, यास छपाईसाठीं दिले.

५५९२ रु

येणेंप्रमाणें चरित्रनायकानें रुपये पांच हजार पांचशें ब्याण्णव वर दानांनिल्याप्रमाणें धर्मदाय केला असून शिवाय आणखी दोन हजार रुपये त्वरित दानधर्म करण्याची त्यांची इच्छा आहे.

# अनुक्रम

# आधार त ग्रंथ

१ प्राचीन भारतवर्ष (इ.स.पूर्वी २००० वर्षांचा इतिहास. ले. डॉ. त्रिभुवनदास लेहेरचंद, रावपुरा, बडोदें).
२ जैन साहित्यनो संक्षिप्त इतिहास (ले. मोहनलाल दलिचंद देसाई, बी.ए., एलएल. बी., ॲडव्होकेट).
३ त्रिषष्ठि शलाका पुरुष (ले. कलिकालसर्वज्ञ हेमचंद्राचार्य).
४ पार्श्वनाथ (ले. प्रसिद्ध वक्ता श्री. चौथमलजी महाराज).
५ जिनवाणी (ले. हरिदत्त भट्टाचार्य).
६ प्रतापी पूर्वजो (ले. डुंगरशी धरमशी संपट).
७ हिंदुस्थानचा इतिहास (ले. वर्वे).
८ भगवान् पार्श्वनाथ (ले. बाबू कामताप्रसाद जैन, एम्. आर्. ए. एस्.)
९ सूरीश्वर अने सम्राट् (मुनिराज श्रीविद्याविजयजी यानीं तत्कालिन प्राचीन व अर्वाचीन संस्कृत, मागधी, गुजराती, हिंदी व इंग्रजी नव्वद ऐतिहासिक ग्रंथांच्या आधारें लिहिलेला अपूर्व ग्रंथ.)

---

# भारतीय प्रभावी पुरुष

## धर्मवीर शांतिदास

### १

सोळावें शतक. भारतवर्षांत मोंगल सम्राट् अकबर आपलें राज्य स्थिर करीत होता. राजपुतान्यावर त्याची दृष्टि वळली होती. इतस्ततः पसरलेली रजपूत राज्यांची परिस्थिति त्यानें न्याहाळिली. ईर्षा, द्वेष आणि सुडाच्या भावनांनीं तीं पोखरली जात होतीं. स्वतंत्र भारताचीं तीं देदिप्यमान किरणें अगदीं निष्प्रभ बनत चाललीं होतीं. अकबरानें ह्याचा पूर्ण लाभ घेतला. साम, दाम, दंड व भेद ह्या चारही उपायांनीं एकामागून एक रजपूत राज्यें त्यानें आपल्या अमलाखालीं आणलीं.

ढगाआड गेला म्हणून काय सूर्य शीतल बनेल ? उपाशीं मरावें लागलें म्हणून का सिंह गवत खाईल ? तीच स्थिति मेवाडच्या राण्याची होती. त्यानें गुलामगिरींतील नामुष्कीचें स्वास्थ्य लाथाडून अशान्ततेचें जिवंत जिणें पत्करलें. हितशत्रु व प्रकट शत्रूंशीं त्यानें सामना दिला. त्यास आपल्या शूरवीर सरदार जहागिरदारांसह रानोमाळ फिरावें लागलें. या फिरण्याच्या अनेक कुटुंबाची पुढें वाताहात झाली.

असाच एका जहागिरदाराचा मुलगा सहस्त्रकिरण गुजराथमध्यें अमदाबादेस आला. हा इतिहासप्रसिद्ध शिसोदिया वंशातील असून ज्ञातीनें ओसवाल होता. पधरा वर्षांचें कोवळें वय आणि निराधार स्थिति. वर आकाशाचें छत्र आणि खालीं जमिनीचा आधार. राजवंशी रजपूत पण परिस्थितीनें लाचार. फक्त एकच अमूल्य वस्तु त्याच्याजवळ होती. दैवाशीं दोन हात करण्याची तयारी ! संकटाच्या मुखांत हसत हसत शिरण्याची निर्भयता !

अमदाबाद म्हणजे गुजरातचें वैभवस्थान. लक्ष्मीदेवींचें निवासस्थान. व्यापाराचें त्या काळचें मोठें केंद्र. त्यामुळें राज्यक्रांतीचेही आघात-प्रत्याघात ह्या शहरास सहन करावे लागत.

शहरात हिंडत हिंडत सहस्रकिरण एका मारवाडी जवाहिऱ्याच्या दुकानापुढें उभा राहिला. वृद्ध जवाहिऱ्याचें त्याच्याकडे लक्ष गेलें. किरकोळ कामें करण्यासाठीं त्याला त्यानें ठेवून घेतलें. परिस्थिति माणसाला गाय बनविते परंतु माणूस आपल्या धडाडीनें परिस्थितीलाच गाय बनवू शकतो हें सहस्रकिरणानें आपल्या कृतीनें सिद्ध केलें. सचोटी आणि सततोद्योग ह्यामुळें त्यानें शेटजींची मर्जी संपादन केली. जवाहिऱ्याच्या धंद्यातहि नैपुण्य मिळवून हुशारी दाखविली. त्यानें आपल्या गुणांनीं शेटजींची इतकी प्रीति संपादन केली कीं, शेटजींना आपली कन्या त्यास देऊन कायमचें आपलेंसें करण्यात यत्किंचितही संकोच वाटला नाहीं. शेवटीं अमदाबादचे प्रमुख जवाहिरे म्हणून त्यानें प्रसिद्धि मिळविली.

ह्या सहस्रकिरणाला दोन मुलें झालीं: वर्धमान आणि शांतिदास. ह्या कर्तबगार पुत्रांवर आपल्या व्यापाराचा पसारा सुपूर्त करून लवकरच सहस्रकिरणजींनीं इहलोकची यात्रा आटोपली

व्यवहाराचा पसारा मोठा होता. दोघा भावांनीं जबाबदाऱ्या वांटून घेतल्या दुकानचा कारभार वर्धमानानें सांभाळला आणि देशपरदेशांत हिंडून माल व गिऱ्हाईक मिळविण्याचें शांतिदासावर येऊन पडलें. वडिलांबरोबर राहून शांतिदासानें हा व्यापार आत्मसात् केला होताच. त्यामुळें माणिक, मोतीं, हिरे, पाचू , नीलम वगैरे रत्नांची पारख करण्यात तो निष्णात बनला. गोड व परिणामकारक भाषा, हसतमुख चेहेरा व स्वाभिमान ह्यामुळें मिसरूडही न फुटलेल्या ह्या पोरानें साऱ्या हिंदुस्थानांत नाव काढलें! राजे-रजवाडे, अमीर उमराव व शेट-सावकारांवर त्यानें स्वत ची छाप बसविली. लक्ष्मीनेंही त्याच्या मस्तकावर वरदहस्त ठेवला.

आपल्या कुलपरंपरेप्रमाणें शांतिदास शस्त्रविद्या शिकला व त्यास विद्येचीही गोडी असल्यानें संस्कृत, प्राकृत, गुजराती आणि फारसी भाषेचाही त्यानें अभ्यास केला. हळूहळू शांतिदासचें नाव अमदाबादच्या प्रमुख जवाहिऱ्यांच्या पंक्तीला जाऊन बसलें.

२

अकबर बादशाह आग्र्याला होते. त्यांना किंमती जवाहीर खरेदी करावयाचें असल्यानें अखिल भारतवर्षांतील नामांकित जवाहिरे तेथें एकत्र झाले होते. दिवाण इ-आममध्यें दरबार भरला होता. रत्नखचित सिंहासनावर बादशहाची स्वारी विराजमान झाली होती. बाजूलाच जवाहिरे बसले होते. अमीर-उमराव, निमंत्रित मांडलिक राजे व सरदार यांनीं दरबार अगदीं फुलून गेला होता. बादशहा स्वतः रत्नपरीक्षा करीत होते. पसंतीस आलेलीं मौल्यवान् रत्नें खरेदी करीत होते. दरबारचे जवाहिरे पन्नालालजी शेजारीं उभे होते. इतक्यात बादशहाला कसली तरी आठवण झाली जवळच असलेली छोटी पेटी त्यांनीं उघडली. एक तेजस्वी हिरा त्यांतून काढला आणि पन्नालालजींच्या हातीं दिला. त्याच्या तेजानें जवाहिऱ्यांचे डोळे दिपले.

'पन्नालालजी !' हिरा देत बादशाह उद्गारले.

'केवढें तेज !' एक बोलला.

'ओहो ! किती मोठा !' दुसरा पुटपुटला.

'याला म्हणावें रत्न !' तिसऱ्यानें पुष्टि दिली.

'काय बरें किंमत होईल ह्याची ?' बादशहानें विचारलें.

'ही तर शुक्राची चमकती चांदणी. ह्याची आम्हीं काय किंमत करावी !' राजजवाहिऱ्यानें नम्रपणें सांगितलें.

'रत्नशास्त्राप्रमाणें ह्याची नक्की किंमत नाहीं करता येणार ?' बादशहानें पुनः विचारलें.

सगळे विचारमुग्ध झाले !

'जरा कठीणच आहे.' राजजवाहिरे बोलले. ज्यांची सारी हयात हिरे, मोतीं, माणिक आदि रत्नांची परीक्षा करण्यांत गेली होती त्यांस जर अंदाज लागेना तर इतर काय करणार ?

'अखिल हिंदुस्थानांतील नामांकित जवाहिरे येथें असतां एकही किंमत करूं शकत नाहीं ?' आश्चर्यानें बादशहा बोलला.

सापाच्या शेपटीवर पाय पडताच जसा तो डिवचला जातो तसाच जवाहिऱ्यांचा स्वाभिमान डिवचला गेला. इशाऱ्यानें चालणाऱ्या उमद्या

प्राण्यास आसुडाचा फटका कसा सहन होणार ?

सर्व दरबार शान्त होता.

'मी हिरा जरा पाहूं शकतों का ?' एका आवाजानें शांततेचा भंग केला. दरबारचे डोळे तिकडे वळले. बादशहानेंही नजर वळविली.

'कोण आहे हा तरुण ?' पन्नालालजींकडे पहात बादशहानें विचारलें.

एक गोरटेला, हसतमुख आणि पाणीदार चेहऱ्याचा तरुण पुढे आला.

'अमदाबादचे प्रसिद्ध जवाहिरे शांतिदास आहेत हुजूर' पन्नालालजींनें सांगितलें.

बादशहानें कौतुकानें त्याच्याकडे पाहिलें आणि हिरा पुढे केला. अत्यंत नम्रतेनें शांतिदासानें तो घेतला. साऱ्या दरबारच्या नजरा त्याच्यावर खिळल्या होत्या. हिऱ्याच्या सर्व बाजू त्यानं न्याहाळल्या. चमक पाहिली. नंतर पेटींतून थोडासा तोल काढून त्यानें त्याचें वजन केलें. ३५० रतीचा तो मोठा हिरा होता. स्वतःच्या छोट्याशा रोजनिशींत त्याची नोंद केली. हिऱ्याची उंची व रुंदी काढली. कांहीं क्षण विचारात घालविले. त्याच्या मुद्रेवर एक प्रकारचें संतोषाचें स्मित झळकलें.

'मी ह्याची नक्की किंमत सांगू शकतों' तरुणानें निश्चयानें उत्तर दिलें.

साऱ्या नजरा मंत्रमुग्ध बनल्या जणू !

'सात लाख मोहोरा' आत्मविश्वासानें शांतिदासजी बोलले.

सर्वांना एकच उत्सुकता निर्माण झाली कीं कोणत्या आधारानें ही किंमत झाली. अकबरानेंही तेंच विचारलें. शांतिदासजींनीं आपल्याबरोबर असलेल्या पेटींतून एक हस्तलिखित प्रत काढली. प्राकृत अपभ्रंश भाषेत ती लिहिलेली होती. एकामागून एक आधार स्पष्ट व खणखणीत आवाजात त्यांनीं वाचून दाखविले. रत्नपरीक्षामीमांसा नांवाचा प्राचीन ग्रंथ होता.

एवढा वेळ निस्तब्ध असलेल्या दरबारांतून 'शाबास जव्हेरीजी' असा एकच ध्वनि निघाला.

बादशहाही खूष झाला. त्यानें मौल्यवान् पश्मिना शाल त्याच्या अंगावर टाकली व 'पादशाही जव्हेरी' ही पदवी देऊन त्याचा गौरव केला.



'मी ह्या हिऱ्याची नक्की किंमत सांगू शकतों.' शांतिदासजींनीं निश्चयानें उत्तर दिलें. (पृ ४)

## ३

अगोदरच शांतिदासजींनीं जवाहिरे म्हणून सर्व हिंदुस्तानात नाव झालें होतें त्यात पुन ह्या सन्मानानें विशेष भर पडली. सिलोनचीं मोतीं, ब्रह्मदेशाचीं माणकें व गोवळकोंड्याचे हिरे वगैरे मौल्यवान् रत्नें घेऊन त्याना वरचेवर दिल्लीस जावें लागे व बादशहाच्या जनानखान्यात जवाहीर खपूं लागले. अमीर उमरावात त्याबरोबरच शांतिदासजींनीं सराफीचा व्यवहार चालू केला राजेरजवाडे अमीर उमरावाना ते कर्ज देऊं लागले. राजकीय अस्थिरता असूनही शांतिदासजींनीं आपल्या बुद्धिकौशल्यानें व्यापारात झळ लागू दिली नाहीं

अकबराच्या साम्राज्याला दिवसेंदिवस स्थैर्य येत चाललें होतें. परंतु त्यास मानसिक स्वस्थता मिळणे कठीण झालें याला कारण राजपुत्र सेलीम हाच होता सेलीम फारच स्वच्छंदी व स्वैराचारी बनला होता त्याच्या विरुद्ध अकबरापुढें वरचेवर कागाळ्या येत चालल्या. आपल्या राज्याचा वारसदार असा नालायक निघाला तर साम्राज्याचें कसें होईल ही भीति त्याला रात्रंदिवस सतावीत असे त्याला सुधारण्यासाठीं बरेच प्रयत्न केले परंतु ते सर्व निष्फळ ठरले. शेवटीं एका विद्वानाची शिक्षक म्हणून नेमणूक केली परंतु पालथ्या घागरीवर पाणी उलट सेलीमने त्यानाच बनविलें आणि त्याचा उपहास केला अकबराच्या कानावर ही गोष्ट आली तेव्हा त्यास फारच संताप आला बादशहानें सेलीमला कडक शासन करण्याचें ठरविलें सेलीम हा जयपूरच्या राजकन्येचा मुलगा होता तिला ही गोष्ट कळली. आपल्या प्रिय पुत्रास वाचविण्यासाठीं तिनें बादशहाकडे बरीच रदबदली केली पण मागील कटु अनुभवामुळें बादशहानें गय करण्याचें नाकारलें अगोदरच रजपूत कन्या, तशात ती बडी बेगम, तिला तो मानभंग कसा सहन होणार ? ती रुसून अमदाबादेस निघून गेली.

ह्यामुळें गुजरातचा सुभेदार विचारात पडला अशा परिस्थितींत बेगमचा बादशाही सत्कार करणें त्यास शक्य नव्हतें. बरें, योग्य सन्मान न झाल्यास तिकडूनही पंचाईत होती त्यानें ह्या पेंचातून सोडविण्याची आपले दोस्त शांतिदासजींना विनंति केली शेटजींनीं ती तात्काळ मान्य केली ते बेगमला जाऊन भेटले 'अमदाबादेस आपण आला आहात

तेव्हा आमच्या मीठभाकरीचा स्वीकार करावा.' शेटजींनी नम्रतेनें विनति केली.

शांतिदासजी जव्हेरी म्हणून दरबारात वरचेवर जात असल्यामुळें अंत:-पुरांत ते सर्वांना परिचित होते. अमदाबादसारख्या शहरात ओळखीचें कोणीच नसल्यानें बेगमसाहेबाना चुकल्याचुकल्यासारखें वाटे. त्यामुळें त्यांनीं ही विनती लागलीच मान्य केली. शेटजींनी आपली भव्य हवेली निवासस्थानासाठीं मोकळी करून दिली. रंगीबेरंगी ध्वजा पताका, हिऱ्या मोत्यांचीं तोरणें, हंड्या आणि झुंबरें यांनीं दिवाणखाना सजविला. त्यात काश्मिरी गालिचे पसरले. अशा प्रकारें दिल्लीच्या राजमहालाशीं स्पर्धा करणारा जणु प्रतिमहालच निर्मिला. सेवेसाठीं दासी आणि नौकर यांचा लवाजमा हजर ठेवला. काय नको आणि काय पाहिजे हें विचारण्या साठीं स्वत शेटजी वरचेवर येऊं लागले.

शांतिदासाच्या आदरसत्कारानें बेगमसाहेब फार खुश झाल्या. शांति दासजींविषयीं त्यांना आपुलकी उत्पन्न झाली. शेटजीही नियमितपणें तेथें जात एकदा असेंच बोलण्यावरून बोलणें निघालें असता बेगमनें सांगितलें, 'जव्हेरीजी, मी रागावून येथें तर आलें, पण परिचयाचें कोणीच नसल्या मुळें आगींतून निघून फुफाट्यात पडल्यासारखें झालें होतें. परंतु तुमच्या-मुळच मला धीर आला.'

'आणि जयपूरची राजकन्या आणि भारतवर्षाच्या सम्राज्ञीचे पाय या झोपडीला लागण्याचें महान् भाग्य मला प्राप्त झालें.' शांतिदासजींनीं विनय प्रकट केला.

'परंतु यामुळें बादशहाचा रोष पत्करण्याची पाळी येण्याचाही संभव आहे.' बेगम बोलली

'आपण त्याची यत्किंचितही चिंता करू नका. अथितिसत्कार हा आमचा परमधर्म आहे त्यात पुन आपल्यासारख्याचा योग यासाठीं येतील ते कष्ट सहन करण्यास आम्ही तयार असतों.' शेटजी बाणेदारपणानें बोलले.

'भाई, याबद्दल मी तुमची कशी उतराई होईन?' बेगम सद्गदित होऊन बोलली.

'मावाची अल्पशी भेट स्वीकारून !' शांतिदासजी बोलले. बहीण नसल्याच्या दुःखाची छटा त्यांच्या चेहेऱ्यावर उमटली होती.

योगायोगच विलक्षण होता. तो भाऊबीजेचा दिवस होता. प्रत्येक स्त्रीला बहीण बनणें केव्हांही आवडतें. शांतिदासजींनीं बहुमूल्य अशीं रत्नजडित कंकणें बीजेच्या ओवाळणीची भेट म्हणून नजर केलीं.

बेगमला येऊन जवळ जवळ दोन महिने होत आले. एके दिवशीं अचानक शहाजादा सेलीम स्वतः आला. मातेला अत्यंत हर्ष झाला. मातापुत्राच्या गुजगोष्टींना भर आला होता. जेवणाची वेळ टळल्याचेंही त्यांना भान राहिलें नव्हतें. ठराविक वेळीं नेहमीप्रमाणें शांतिदासजी स्वतः आले.

'कुमार, तुझे मामा आलेत.' हसत हसत बेगम प्रेमळपणानें बोलली. नमस्कार करून सेलीमनें मातेच्या शब्दाला मान दिला. परंतु आश्चर्यचकित नजरेनें मातेकडे तो पाहूं लागला.

'ही पाहिली ओवाळणी?' असें म्हणून बेगमसाहेबांनीं आपले हात पुढें केले आणि रत्नजडित कंकणें दाखविलीं. नंतर शांतिदासजींकडे पहात त्या म्हणाल्या,

'भाई, आता आमच्या जाण्याची तयारी करा.'

'कां इतकी घाई ! गरीब भावाचा कंटाळा आला वाटतें ?' शांतिदासजी बोलले.

'दोन महिने झाले तरी घाईच का ? सेलीम न्यायलाच आला आहे मला. बादशहानें शहाजाद्यावर रहम केली म्हणूनच जाऊं म्हणतें.' बेगम उत्तरली.

इतक्यांत दासी भोजनासाठीं बोलावण्यास आली.

'कां ! आज जेवणाचीसुद्धा आठवण नाहीं वाटतें ? गप्पांनींच पोट भरलें कीं काय ?' शेटजींनीं सौम्य विनोद केला व हसत हसत ते उठले.

दुसऱ्या दिवशीं बेगमसाहेबांना घेऊन सेलीम दिल्लीकडे रवाना झाला. बेगमनें शांतिदासजींनीं केलेल्या आदरसत्काराचें बादशहापुढें खूप वर्णन केलें व शेटजींची प्रशंसा करून आपण त्यास बंधु केल्याचें सांगितलें. तें ऐकून बादशहा खूष झाला व शांतिदासजींस त्यानें दिल्लीस बोलावून मरजवी पोषाख देऊन त्यानें दरबारांत त्यांचा गौरव केला. त्यांना पहिल्या

प्रतीचे अमीर बनून 'अमदावादचे नगरशेट' हा किताब वंशपरंपरा दिला. त्याप्रमाणे गुजरातचा सुभेदार खान-इ-अजम याच्यावर आज्ञापत्र पाठविले. बेगमने धर्मबंधु मानल्यामुळे शांतिदासजी दिल्लीच्या दरबारात 'जव्हेरी मम्मा' या नावानेच ओळखले जात.

४

आपल्या व्यवहाराच्या विश्वासात शेटजी निमग्न होते. दिवसेंदिवस व्यवहाराचा व्याप वाढतच होता. निरनिराळे सरदार-सुभेदार त्यानाही ते कर्ज देऊ लागले. अशा घडामोडींत हा हा म्हणता दोन वर्षे निघून गेली. ह्या प्रपंचावरोवर परमार्थ साधण्यातही ते तत्पर होते. नगरशेट ह्या नात्याने सर्व अमदावादची त्यांच्यावर जबाबदारी होती. त्यांचे घर म्हणजे दुःखी, पीडित आणि अनाथांचे आश्रयस्थानच बनले होते. त्यांची परोपकारिता सर्वश्रुत होती.

मोगलांच्या राजवटीत मंदिरांचे संरक्षण करणे फार आवश्यक परंतु अत्यंत दुर्घट होते. आपल्या पैशाचा आणि प्रतिष्ठेचा शेटजींनी ह्यासाठी अगत्यपूर्वक उपयोग केला. अमदावादची सर्व मंदिरेच नव्हे तर शत्रुंजय, आबू, मक्षेश्वर वगैरे अखिल भारतवर्षातील प्रमुख जैनतीर्थांची व्यवस्थाही तेच पहात. म्हणूनच एकोपा राखण्याचे महत्कार्य त्यांनी यशस्वी रीतीने पार पाडले. मोगलांच्या राजवटीतही ही सर्व धर्मस्थाने शेटजींच्या प्रतिष्ठेमुळे सुरक्षित राहिली.

इ. स. १६१२ त तीर्थाधिराज शत्रुंजयाच्या यात्रेला ते गेले. तेथील जीर्ण मंदिराचा उद्धार करण्याची त्यांनी व्यवस्था केली. अमदावादेला इ. स. १६१८ त मुक्तिसागर नावाच्या विद्वान् आणि त्यागी मुनिराजांचे आगमन झाले. ते विद्वान् असून उग्र तपस्वी होते. बुद्धिमान् जितेंद्रिय शास्त्रपारंगत, निर्भीड आणि विचारी असल्यामुळे मोठमोठ्या विद्वानानाही त्यांच्याविषयी आदर होता. त्यांची दिव्य प्रतिभा थोरथोरांना मुग्ध करीत होती. त्यांच्या आदर्श चारित्र्याने आणि उपदेशामुळे अनेक लोकांचे जीवन आदर्श बनले. 'जगात जीवनाचे दोन आदर्श आहेत: ताड आणि रन. एक उंच वाढून स्वतःच्या ऐश्वर्याचे आणि इभ्रतीचे प्रदर्शन करतो

तर दुसरा स्वत च्या बलिदानानें जगाला सुखी करण्यात आनद मानतो, तोडला किंवा जाळला तरी तो आपला स्वभाव सोडीत नाहीं हेंच खरें जीवन आहे. मानवी जीवनाचा हा खरा आदर्श आहे अशा महापुरुषाच्या जन्मानें जगात आनद पसरतो त्याच्या मृत्यूनें जग दु खी बनतें परतु सुखानें त्याचें मन लोभावत नाहीं की दु खानें विव्हल होत नाहीं मृत्यूवरही विजय मिळवून ते अमर बनतात म्हणूनच असल्या विभूतींचें जीवन, जगज्जीवन मानलें जातें अशा महान् विभूतींच्या सहवासानें, गुणश्रवणानें आणि त्याच्या पादस्पर्शानें पवित्र झालेल्या स्थानाच्या दर्शनानें मनुष्याला आपलें जीवन आदर्श बनविण्याची स्फूर्ति मिळते असल्या स्फूर्तीनेंच मानव आत्मविकासाच्या अतिम ध्येयाला स मुख होतो' मुनिराजाचा अशा प्रकारचा हृदयस्पर्शी उपदेश श्रोत्याच्या अत करणाचा ठाव घत होता

शेठजींच्या मनावरही ह्याचा मोठा परिणाम झाला तीर्थाधिराज शत्रुजयावर मोठा सघ काढून जाण्याची त्याची फार दिवसापासून असलेली उत्कठा पुन तीव्र झाली सतत जलसिंचनानें वेलींना तजेला यावा तसें घडलें त्यानीं आपली इच्छा मुनिराज मुक्तिसागरजींजवळ बोलून दाखविली मुनींच्या समतीनें एक मोठा धर्मसघच काढावयाचें निश्चित केलें

ज्या वेळीं मदिरें आणि तीर्थस्थानें ह्याचें अस्तित्वच धोक्यात होतें, चोहोंकडे अशातता आणि अराजकता पसरलेली होती, अशा वेळीं तीर्थयात्रेसाठीं मोठा सघ काढण म्हणजे एक दिव्यच होतें

इ स १६१८ त त्यानीं ही महान् धर्मयात्राच काढली पूज्य गुरुदेव मुक्तिसागरजींनाही आपल्या शिष्यसमूहासह बरोबर घेतलें होतें बरोबर शेंकडों तबू, राहुट्या आदि सामानसुमानाच्या तीन हजार गाड्या असून पधरा हजाराचा जनसमूह यात्रेसाठीं निघाला होता गुजराथच्या सुभेदारानें सरक्षणासाठीं पाचशें स्वार दिमतीला दिले होते *स्वत जहागीर बादशाहानें ह्या सघास सर्वतोपरी सरक्षण देण्याचें फरमान काढल होतें रस्त्यात निरनिराळे राजेरजवाडे, सरदार सुभेदार आणि शेटसावकार याजकडून या सघाचें हार्दिक स्वागत झालें

---

* इ स १६०५ मध्यें बादशहा अकबर मरण पावला त्यानतर शहाजादा सलीम हा जहागीर हा किताब घऊन दिल्लीच्या गादीवर बसला होता

अमदावादेहून पायीच (प्रवास) तीर्थयात्रा करावयास निघालेला हा प्रचंड संघ धर्मरंगात दंग होऊन मजल दरमजल करीत शत्रुंजयला पोहोचला. तीर्थाधिराज शत्रुंजयाच्या दर्शनानें त्याना अत्यंत हर्ष झाला. मोठ्या भक्तिभावानें सर्वांनी हात जोडले. निसर्गसुंदर स्थानीं असलेले गगनचुंबी वैभवशाली जिनप्रासाद पाहून शेटजींचें मन रमलें. वातावरणात शातता आणि उदात्तता मूर्तिमंत स्वरूपात वावरत होती. भगवान् ऋषभदेवाच्या भव्य मूर्तीपुढें शेटजींनीं भक्तिभावानें हात जोडले. त्या अलौकिक स्वरूपात ते अगदीं तन्मय झाले. त्यांचें देहभानही हरपलें. ह्या कारणानेंच तर निसर्गरम्यस्थानें तीर्थस्थानेसाठीं नाहीं ना निवडली गेली ?

तीर्थांतील मुख्य मंदिरासमोरच दोन देव्हारे स्थानीं तयार करविले होते. (हे दोन्ही देव्हारे हल्लींही विद्यमान आहेत.) शातिदासजींनीं गुरुदेवाच्या हस्तें त्यात दोन जिनमूर्तींची प्राणप्रतिष्ठा केली. यात्रेकरूंनींही अत्यंत भक्तिभावानें यात्रा केली. मुक्तिसागरजींनीं तीर्थयात्रा करण्याचा उद्देश, श्रीसंघाचें स्वरूप, संघ काढण्याचें प्रयोजन आणि महत्त्व वगैरे विषय विद्वत्ताप्रचुर व मधुर वाणीनें लोकांच्या मनावर ठसविले. लोकांनीं शातिदासजींस धन्यवाद देऊन गुरुदेवाच्या जयजयकारात संघपतीची माळ त्यांच्या गळ्यात घातली. त्यानंतर हा बृहत्संघ परतला. मार्गांत लागणाऱ्या गावातील लोकांनीं संघ आणि संघपतीचा मोठा सन्मान केला आणि आपलीं सुखदुःखेंही त्यांच्यापुढें मांडलीं. शातिदासजींनीं त्याच्या अडीअडचणी दूर करण्यासाठीं शक्य ती सर्व प्रकारची व्यवस्था करून दिली.

अशा प्रकारें तीन महिन्यांनीं हा प्रचंड संघ निर्विघ्नपणें परत आला. लहान लहान ठाकूर, कोळी, भिल्ल, मीयाणे वगैरेंचा त्रास, चोर, लुटारू, दरवडेखोर आणि यवन सरदाराचा उपद्रव, निरनिराळ्या रोगाच्या साथी अशा भयानक परिस्थितींत पंधरा हजार स्त्रीपुरुषाच्या संरक्षणाची आणि व्यवस्थेची जबाबदारी यशस्वी रीतीनें पार पाडणाऱ्या ह्या धर्मवीराच्या दीर्घदृष्टीची आणि पुरुषार्थाची कल्पनाच केलेली बरी.

५

तीर्थयात्रेहून परतल्यापासून शातिदासजींच्या अंतःकरणातील प्रमु-

भक्तीचें बीज फोफावत चाललें. तीर्थदर्शनानें अन्तःकरणात धर्मप्रेम दृढ होत असल्याची त्याना प्रचीति आली. विमलशाह, वस्तुपाल, तेजपाल धन्नासंघवी यानीं कोट्यवधि रुपये खर्च करून हीं धर्मस्मारकें का निर्माण केलीं हें त्याच्या लक्षात आलें.

वीतराग अशा परमात्म्याचें पुण्यस्मरण नित्य ताजें करून देणाऱ्या आणि आपल्या भावना विशुद्ध करणाऱ्या जिनमंदिराविषयीं त्याच्या अंतः-करणात अपूर्व प्रेम जागृत झालें. त्यामुळें लोककल्याणकारी असें जिन-शासनचें एक चिरस्मारक अमदावादेला उभारण्याचें त्यानीं आपल्या बधूच्या संमतीनें ठरविलें. जैन शिल्पशास्त्राप्रमाणें त्याचा एक नकाशा तयार करविला. अमदावादच्या प्रमुख लोकाशीं विचारविनिमय करून मध्य-वस्तींत असलेल्या बिबीपुऱ्यात एक विशाल जिनमंदिर बाधावयाचें निश्चित केलें. यासाठीं ते स्वतः दिल्लीला गेले. बादशहा जहागिरानें त्याचा मोठा सत्कार केला. शातिदासजींनीं अमदावादेस बिबीपुऱ्यात एक जिनमदिर बाधण्याची उत्कट इच्छा प्रकट केली. मदिराचा नकाशा दाखवून त्या जागेची परवानगी मागितली.

बादशहानें शातिदासजींच्या इच्छेप्रमाणें मोठ्या आनंदानें परवानगी दिली.

बादशहाचा हुकूम मिळताच त्यानीं आग्रा आणि दिल्ली येथें असलेल्या नामांकित कारागिराना अमदावादेस पाठविलें. जयपूरचा मौल्यवान संगमरवरी दगड खरेदी केला. गुजरातच्या नामांकित शिल्पज्ञाना त्या कामीं नियोजित केलें. अमर होणारी जिवंत कलाकृति निर्माण करण्याची त्याची इच्छा होती. त्यासाठीं त्यानीं पाण्यासारखा पैसा खर्च केला.

इ. स. १६२१ त कामाला सुरवात झाली. भक्त आपल्या इष्ट देवा-पुढें सर्वस्व समर्पण करण्यास सिद्ध झाला. कलावंतानींही आपली कला-निर्मितीची हौस पुरी करून घेतली. सर्वांनीं त्यात आत्माच ओतला. त्यामुळें शेकडो कारागिराच्या अविश्रान्त श्रमानें एक अपूर्व धर्मस्थान निर्माण झालें. भारतवर्षाच्या वैभवात आणखी एक भर पडली.

त्या वेळीं हिंदुस्थानात आलेल्या पाश्चिमात्य प्रसिद्ध प्रवाश्यानीं ह्या कृतीबद्दल गौरवाचे उद्गार काढले आहेत.

इ. स. १६३८ त आलेला प्रवासी आल्बर्ट डी-मेन्डेल्स्लो याने या मंदिराबावत असें लिहून ठेवलें आहे कीं—

'हें मंदिर म्हणजे जगातील एक अति रम्य कलाकृति आहे. माझ्या अमदाबादच्या प्रवासाच्या वेळीं हें मंदिर बांधणारे शांतिदास शेठ हयात होते. मंदिराच्या चोहोंबाजूला उच्च तटबंदी होती. आत विस्तीर्ण चौक होता. सिंहद्वारावरच काळ्या पाषाणाचे दोन प्रचंड हत्ती होते. त्यावर शांतिदासजींचा पुतळा बसविलेला होता. मंदिरात वर छत होतें. भिंतीवर अत्यंत कौशल्यानें निरनिराळ्या प्रकारची वेलबुट्टी, पशी, अप्सरा राज दरबार, देवक्रीडांचें कोरीव काम होतें. चोहोंबाजूला असलेल्या छोट्या मंदिरात तीर्थंकराच्या असंख्य मूर्ति होत्या. मध्यभागीं तीन मोठीं अंतर्द्वारें असून त्यात प्रभूची मूर्ति होती. पितळी दीपमाळा चोहोंकडे प्रकाश फैलावीत असत.'

सुप्रसिद्ध फ्रेंच प्रवासी टॅव्हर्नियर यानें सुद्धा आपल्या प्रवासवर्णनात या मंदिराची भव्यता आणि शिल्पकला याबद्दल प्रशंसोद्गार काढले आहेत.

'चिंतामणिप्रशस्ति' नावाच्या संस्कृत ग्रंथात या मंदिराचें खालील प्रमाणें वर्णन आहे — वि. स. १६७७ (इ.स. १६२१) मध्य वर्धमान आणि शांतिदास हे अलोट संपत्तीचे स्वामी बनले. त्याचें जीवन अत्यंत साधें आणि पवित्र होतें. त्यानीं बिबीपुऱ्यात एक भव्य आणि सुंदर मंदिर बांधलें. मंदिराच्या दाराजवळच आशीर्वादासाठीं पंच पत्र होतें. उच्च आणि विशाल पायऱ्या स्वर्गाकडे नेण्याच्या सूचक होत्या. त्यात सहा भव्य विभाग होते. ते मेघनाद, सिंहनाद, सूर्यनाद, रंगमंडप आणि गदगोत्र या नावानें ओळखले जात मंदिरावर दोन मनोरे असून सभोवतीं चार मंदिरें होतीं.

ह्या मेरुतुल्य मंदिरात भगवान् चिंतामणी पार्श्वनाथाच्या प्रतिमेची इ. स १६२५ त मोठ्या धामधुमीनें प्राणप्रतिष्ठा झाली.

शांतिदास शेटजींच्या खास निमंत्रणावरून प्राणप्रतिष्ठेनंतर हें सुप्रसिद्ध सुंदर आणि भव्य जिनमंदिर पाहण्यास स्वतः जहांगीर बादशहा आले होते

इ.स १६२७ त बादशहा जहांगीर मरण पावला. ह्या वेळची परिस्थिती फारच अशांततेची होती. राज्यासाठीं दिल्लीला रस्सीखेच चालू होती. नूरजहानला सिंहासन आपल्या हातीं ठेवावयाचें होतें. म्हणून तिनें दारा

जादा शहार्यारला हातासीं धरलें. परंतु तिच्या मानानें शहाजहानचा पक्ष घेतला. नेवटीं शहाजहान बादशहा गादीवर बसला.

त्यानें शहार्यारचा खून करविला व आपली बादशाही शाबीत करून घेतली. ह्या राजकीय अशाततेच्या वादळात शातिदासजींनीं किती दूरदर्शीपणानें स्वत चें स्थान व वर्चस्व कायम राखलें असेल याची कल्पनाच केलेली बरी.

कंदहारच्या लढाईमुळें बादशहाला पैशाची मोठी टचाई पडली. बादशहानें शातिदासजींना दिल्लीस बोलाविलें आणि मोठ्या कर्जाची मागणी केली. शातिदासजींनीं बादशहाला मोठी रक्कम कर्जाऊ दिली. त्याबरोबरच त्या प्रसगाचा वैयक्तिक स्वार्थ साधण्याकडे उपयोग न करता त्यानीं तीर्थरक्षणाच्या सनदा मिळविण्याच महत्कार्य साधलें. इ स. १६२९ त २१ मे रोजीं पहिलें फर्मान निघालें त्यात म्हटले आहे कीं—

'नामवर बादशहाना कळते कीं सखेश्वर, केसरियाजी वगैरे देवस्थानें फार प्राचीन आहत अमदाबाद येथील तीन, सुरतचीं एक आणि राधनपूरचीं एक अशा पाच पौषधशाला शातिदासजींच्या मालकीच्या आहेत. ह्या सर्व धर्मस्थानात आणि चितामणी पार्श्वनाथाच्या मदिराबाबत कोणीही हस्तक्षेप करता कामा नये.'

शहाजहान बादशहा कलेचा चाहता होता. त्यानं सहा कोटि रुपयाचे मयूरासन तयार करविलें मयुराच्या पिसाऱ्यात बसविण्यासाठी लागणारी बहुविध मौल्यवान् रत्नें शातिदासजींनीच पुरविलीं त्यामुळें बादशहाशीं असलेला त्याचा परिचय दृढ झाला. स्वत शहाजहान बादशहानें त्याना हत्ती घोड्याचा नजराणा पाठविला होता

प्राचीन तीर्थस्थानावर सशस्त्र चौक्या बसविण्यात आल्या त्याबरोबरच बादशहापासून प्राप्त परिस्थित्यनुरूप तीर्थरक्षणाबाबत सनदा मिळविणेंही चालू ठेवले काही दिवस जात नाहींत तोंच मोगलांच्या धाडच्या पाली ताणा व राणकपूरच्या भागात पडल्याची बातमी आली त्यामुळें देवस्थान आणि यात्रेकरूना सैनिकापासून उपद्रव होऊ लागला. तेव्हा शातिदासजींनीं बादशहाची पुन भेट घेतली.

इ. स. १६५६ त शातिदासजींनीं सखेश्वर गाव आपल्या ताब्यात

घेतला आणि पुनः एक नवीन सनद शहाजहान बादशाहाकडून मिळविली कीं शांतिदास हे आमचे पहिल्या प्रतीचे अमीर आहेत. त्यांनीं असा अर्ज केला आहे कीं, पालिताण्याला पुष्कळ यात्रेकरू येतात. त्यांना उपद्रव होऊ नये, म्हणून आम्हीं पालिताणा गाव शांतिदासशेटजींना इनाम दिला आहे. तरी अधिकाऱ्यांनीं त्या बाबतींत कोणत्याही प्रकारें हस्तक्षेप करू नये

शेवटीं समय ओळखून बादशहाला दोन लाख मोहरा देऊन शांतिदासजींनीं शत्रुंजय परगणा वंशपरंपरा इनाम मिळविला.

अशा प्रकारें पैसा, प्रतिष्ठा व सशस्त्र फौज यांच्या द्वारा जैन संस्कृतीचीं तीं वैभवशाली स्मारकें प्राणाच्या मोलानें नगरशेट यांनीं जतन केलीं.

## ६

मनुष्य अनेक योजना करतो. स्वत च्या कर्तबगारीवर पूर्ण विश्वासून असतो, परंतु दैव अथवा निसर्ग कांहीं वेगळेंच घडवितें.

इ. स. १६४४ पर्यंत गुजरातच्या सुभेदारीवर अजमखान होता. शेटजींचा तो परमस्नेही असल्यानें सर्व बाबतींत त्याची मोठी मदत होई. अजमखान वृद्ध झाल्यामुळें त्यानें नोकरीवरून निवृत्त होण्याची इच्छा बादशहाकडे प्रदर्शित केली त्याच वेळीं बादशहाची मुलगी जहान आरा आजारी असल्यामुळें औरंगजेब दक्षिणेतून दिल्लीस आला असताना त्याचीच गुजरातचा सुभेदार म्हणून नेमणूक झाली. व इ स. १६४५ त सुभेदार म्हणून औरंगजेब अहमदाबादेस आला.

औरंगजेब स्वतःस 'सच्चा इस्लामी' समजत असे. धर्म हा आत्मगुणपोषक असतो. सूर्य उगवताच अन्धःकार नाहींसा होतो. चोराला पाहताच श्वापदांना धडकी भरते. त्याचप्रमाणें अन्तःकरणांत धर्म शिरताच ईर्षा, असूया, अशांति नष्ट होते. तापलेल्या जीवांना खरी शीतलता देणारा चंदन आहे तो. परंतु कोणासाठीं? योग्य माणसासाठीं. धर्मवाटीला अयोग्य असणाऱ्यावर त्याचा विपरीत परिणाम होतो. द्राक्षें किती गोड, मधुर आणि रुचकर असतात! परंतु त्याची दारू आरोग्याला घातुक ठरते. कोणत्याही गोष्टीचा अतिरेक त्याज्य हेंच खरें. तीच धर्माची स्थिति आहे. औरंगजेबाच्या

चावर्तीत तीच स्थिति होती. धर्मवेडाचा नशा त्याला चढला होता. इस्लामशिवाय कोणतीही धर्मस्थानें त्याला पापस्थानें वाटायचीं. मशिदींत बांग पुकारून ज्याची उपासना होते त्याच अल्लाची उपासना इतर मंदिरांतून होत असते हें सत्य त्याला उमगेना. राम आणि रहीम हे परस्पराचे कट्टे शत्रु आहेत असें त्याला वाटे. धर्मस्थानात हस्तक्षेप करून त्याचा विध्वंस करण्यासही तो मागेंपुढें पहात नसे. त्यामुळें त्याचें गुजरातच्या सुभेदारीवरील आगमन शांतिदासांना चिंतास्पद वाटलें.

सकाळची वेळ होती. शहर पाहण्यासाठीं सुभेदार औरंगजेबाची स्वारी निघाली होती. फिरता फिरता तो बिबीपुऱ्यात आला कोपऱ्यावरच असलेल्या प्रचंड काळ्या हत्तीकडे त्याचें लक्ष गेलें

'किसका महल है यह?' डोळे भरून पहात तो बोलला.

'महल नहीं सरकार. यह तो मंदिर है.' सरदार बोलला.

'किसने बनवाया है?' कपाळावर आठ्या चढवीत औरंगजेबानें विचारलें.

'नगरशेट शांतिदासजीने.' जबाब मिळाला.

'कौन? झवेरी मामु?'

'जी.'

संतापानें त्यानें ओठ दाबले. त्याच्या डोळ्यात एक विलक्षण चमक आली.

'खुदाका मुल्क होते हुये भी काफरोंकी यह मजाल?' तो बोलला.

'नगरशेट अव्वल दर्जेके अमीर होनेसे शहेनशाह जहाँगीरने उन्हे यह मंदिर बनवनेकी इजाजत दी थी हुजूर!' सरदार पुटपुटला.

'अच्छा. देखा जायऽऽगा!' औरंगजेब परतला.

त्याची खुनशी नजर मंदिराच्या चाणाक्ष रक्षकांनीं ओळखली. भुजंगाचे विषारी फूत्कार होते ते.

मंदिर हें संस्कृतीचें प्रतीक आहे. हजारों वर्षांनंतरही आर्यसंस्कृतीला गौरव प्राप्त करून देणारा इतिहास आहे ही गोष्ट त्याला डाचत होती. मोंगलांचें राज्य असतांना स्वतःच्या इस्लामी संस्कृतीपेक्षाही भव्य व वैभवशाली अन्यधर्मीय स्मारक त्याला कसें सहन होणार?

महालात आल्याबरोबर आतापर्यंत दबलेलें त्याचें उग्र रूप प्रकट झालें.

संतापानें त्याचे डोळे व चेहरा लाल झाला. त्यानें कोतवालास बोलावणें पाठविलें. कोतवाल तें जमदग्निस्वरूप पाहून घाबरून गेला. थरथरत त्यानें कुर्निसात केला.

'कोतवाल, क्या ऐसाही कारभार चलाते ?' वीज कडाडली.

'गुन्हा माफ सरकार. कसूर फरमायेंगे हुजूर.' अजीजीनें कोतवाल घाबरत घाबरत बोलला.

'कसूर ! मुसलमानी रियासतोंमें काफीरोंके ऐसे मंदर ! क्या करतेहो तुम लोग ?' कोपानें पेट घेतला.

'खुद जहाँपन्हाँ जहाँगिरका फरमान था ! हम क्या कर सकते थे हुजूर ?' कोतवालानें आपली असमर्थता प्रकट केली.

'खामोश ! उसे रोकनेकी क्यों न कोशीश की ?' स्फोट झाला. 'अच्छा ठहरो. देखो. उस मन्दरमें कितने रक्षक है ?' काही विचार करीत औरंगजेब बोलला.

'सौके पचास होंगे.' कोतवालानें जबाब दिला.

औरंगजेबानें दोनशें स्वारांची एक तुकडी बोलाविली आणि कोतवालास हुकूम केला, 'सैनिकांसह जाऊन मंदिराचा कबजा घ्या. आडवे येतील ते कापून काढा. हुकमांत कसूर झाल्यास याद राखा.'

सलाबतजंगासह दोनशें घोडेस्वारांची तुकडी घेऊन कोतवाल मंदिराकडे निघाला.

औरंगजेबाची पाठ वळताच मंदिराच्या रक्षकांपैकी एकानें लागलीच ही गोष्ट शेटजींना कळविली. शांतिदास शेटजी गंभीर झाले. करारीपणाची छटा त्यांच्या चेहऱ्यावर झळकली. त्यांनी वर्धमानशेटजींबरोबर तातडीचा विचारविनिमय केला. भावी संकटाचें स्वरूप ओळखून मंदिरातील मुख्य मूर्ति सुरक्षित ठेवून पूर्वीप्रमाणेंच कार्यक्रम चालू ठेवण्यास सांगितलें. त्याबरोबरच महाजनांना बोलावण्यासाठीं एक सेवक रवाना केला.

त्या वेळीं 'महाजनसभा' हें अमदाबादचें एक वैशिष्ट्य होतें. साऱ्या गावाचे सारे सत्ताधारी लोकप्रतिनिधि महाजनच असत. सर्व जाती तेथें संघटित स्वरूपांत होत्या आणि प्रत्येक जात आपापला पुढारी नेमत असे. त्या जातीचे सर्व नियम व कार्य सर्वानुमतें चालत असे. ज्याचा मतभेद

होई त्यास एक तर सर्वांचें ऐकावें तरी लागे नाहींतर जातीबाहेर तरी व्हावें लागे. अशा प्रकारें सर्व जातींचे पुढारी मिळून महाजन बने. नगर-शेट त्याचे मुख्य होते.

नगरशेटजींच्या दिवाणखान्यांत महाजन एकत्र जमले. शांतिदासजींनीं प्रसंगाची तीव्रता सर्वांना जाणवून दिली. देवस्थानावरील आक्रमणाचें वृत्त ऐकून सर्वांच्या चित्तवृत्ति संतापानें प्रक्षुब्ध झाल्या. हातीं शस्त्र घेऊन दोन हात करण्याचें काहींनीं सुचविलें. आपापले चौकीदार मंदिरसंरक्षणासाठीं पाठविण्याचेंही ठरलें आणि 'आमच्या पूज्य देवस्थानाच्या रक्षणासाठीं प्राण देण्यासही आम्ही तयार आहोंत' असें म्हणणाऱ्या तरुणाची तुकडी तयार झाली. त्याबरोबरच शिष्टमंडळ घेऊन औरंगजेबाकडे जाण्याचेंही ठरलें. हा विचारविनिमय होतो आहे तोंच रस्त्यात गर्दी जमल्याचा कोला-हल ऐकूं आला. घाबऱ्या घाबऱ्या एक माणूस धावत आल्याची वर्दी आली. शेटजींनीं त्यास आत बोलावलें. धापा टाकीतच त्यानें औरंगजेबाच्या स्वारानीं मंदिर वेढल्याचें सांगितलें. सर्व विचारविनिमय तेथेंच राहिला. प्रथम मंदिराकडे सर्व तातडीनें गेले.

कोतवाल स्वारासह टप् टप् करीत गावातून निघाला. मंदिराबाबत गावात कुणकुण पसरली होतीच. त्यामुळें लोकाच्या टोळ्याच्या टोळ्या स्वाराच्या मागून निघाल्या. एकदम मंदिर वेढण्यात आलें. रक्षक साव-धान झाले. 'बऱ्या बोलानें बाहेर निघा नाहीं तर मराल.' कोतवालानें सांगितलें. काहीं बाहेर पडले पण काहीं लढले ते मारले गेले. लोकाची गर्दी वाढतच चालली. सैनिकाची संख्या वाढविण्यात येऊन मंदिराचा कब्जा बळजबरीनें सत्तेच्या जोरावर घेण्यात आला. यामुळें लोकात तीव्र असंतोष पसरला. लहानमोठे दगे आणि चकमकी सुरू झाल्या. महाजनाचें शिष्टमंडळ औरंगजेबाकडे पोहोंचलें. पहाऱ्यावरील शिपायानें अडविलें. स्वपोषकाच्या आश्रयाला असलेला श्वानच तो. शेटजींनीं एक मोहोर फेकली. भाकरीचातुकडा मिळताच कुत्र्याचें शेपूट हाललें. शिपायानें वर्दी पोहोंचविली.

'अभी नहीं फिर मिलना.' आतून जबाब आला. अपमानाचा कडू घोट शांतिदासजींनीं तसाच गिळला. शेवटीं शांतिदासजींनीं लेखी अर्ज सादर केला. त्यात अकबर बादशहापासून सारखा चालत येणारा संबंध व

दिल्लीच्या तख्ताची बजावलेली सेवा त्यांनी सर्व नमूद केली आणि मंदिर-नाशासाठी पाठविलेल्या फौजेनें जी दंगल माजविली आहे तिचा परिणाम फारच विपरीत होईल हें बजावण्यास शांतिदासजी चुकले नाहींत.

ह्या अर्जाचा व्हावयाचा तोच परिणाम झाला. 'आम्ही करतों तें खुदाचे योग्य तेंच करीत असून त्यात जराही फरक होणार नाहीं. आम्हाला तुमचा सल्ला नको आहे' असला उर्मट जबाब आला.

शेटजींच्या सर्व आयुष्यातील हा पहिलाच अपमान असल्यानें त्यांना फारच संताप आला. आपल्या धर्मस्थानावर झालेल्या हल्ल्यानें त्यांचें पित्त उसळलें. शिष्टमंडळाच्या फंदात पडल्यामुळें योग्य प्रतिकार झाला नाहीं ह्याचें त्यांना फार वैषम्य वाटलें. मंदिरावरचा हा आघात परतविण्याची त्यांनी प्रतिज्ञा केली. बादशाही सत्तेशीं दोन हात करणें प्राप्त होतें. त्यातून काहीं निष्पन्न होईल असें वाटेना कारण सारी बादशाही सत्ता प्रतिस्पर्धी म्हणून समोर उभी राहील. शेटजींना काही सुचेना. समय-सूचकता दाखवून मंदिरातील पहारेकरी व त्याच्या अंमलदारांना लाचलुच-पत देऊन त्यांनी भुयारात नेलेल्या मूर्ति सुरक्षितपणें बाहेर आणल्या.

सध्याकाळीं औरंगजेब मंदिराकडे निघाला. सैतानी समाधानाचें हास्य त्याच्या चेहऱ्यावर विलसत होतें. टप् टप् करीत तो घोड्यावरून निघाला. जणू काय लोकांच्या धर्मभावनांनाच तो तुडवीत चालला होता. मंदिरा-जवळ स्मशानशांतता होती. सरदारांसहित औरंगजेब आत शिरला.

'ओ हो! कैसा लाजबाब मदर यह!' आश्चर्यानें तो उद्गारला.

'लाखों मोहोरा खर्च झाल्या आहेत हुजूर.' कोतवाल बोलला.

'तर मग ह्याचा उपयोग करून घेतला पाहिजे.' निश्चयार्थक स्वरात औरंगजेब बोलला.

'जमीनदोस्तच करावें लागेल हुजूर. मंदिराचा आणखी कोणता सदुप-योग होऊ शकणार?' सरदार बोलला.

'ह्याची आपण मशीद बनवू. हीं सर्व चित्रें फाडून टाकून साधेपणा आणला म्हणजे झालें. हें पहा, मुल्ला मिस्त्रीला बोलवा आणि सुधारणा करवून घ्या. पुढचा महिना रमजानचाच आहे. मौलवी फत्तेउल्लाना बोलावून त्यांच्या हस्तें खुदाच्या चरणीं ही सेवा रुजू होऊं द्या.'

औरंगजेब परतला. साऱ्या गावात ही वार्ता पसरली. गावातील लोकांनी निषेधार्थ लागोपाठ तीन दिवस व्यवहार बंद केले. शांतिदासजींवर आघातच झाला. संतापानें ते थरथर कापू लागले. मंदिर परत घेईन तेव्हाच अन्न ग्रहण करीन अशी त्यांनी भीष्मप्रतिज्ञा केली. त्यांच्या सर्व कुटुंबानेंही तीन दिवस अन्न वर्ज्य केलें. बराच विचार करून शांतिदासनींनीं दिल्लीस जाण्याचा विचार केला

रात्रीं नऊ वाजण्याची वेळ होती. दिवाणखान्यात वर्धमानशेटजी बसले होते. शांतिदासजी तेथें आले. त्यांनीं दिल्लीस जाण्याचा आपला विचार त्यांना निवेदन केला

'वेडा आहेस शांतिदास. दिल्लीस जाऊन काय उपयोग?' वर्धमानशेटजी बोलले

'शहाजहान बादशहाच्या द्वारा न्याय मिळविण्यासाठीं.'

'अरे, बेऱ्यावर काय बाप सत्ता चालवील? मला तर त्यात कांहींच तथ्य वाटत नाहीं.'

'बादशहावर सुल्तान दाराचें चांगलेंच वजन आहे. तेव्हा त्याच्याकडून यश्र्वें काम सहज निघू शकेल असें मला वाटतें '

'ठीक आहे तुझें म्हणणें, प्रयत्न करावयाला कांहींच हरकत नाहीं' वर्धमानशेटजींनीं संमति दिली. वयाचीं साठ वर्षे उलटलीं असूनही एवढा लांबचा बिकट प्रवास करण्यासाठीं धर्मवीर शांतिदासजी दुसऱ्या दिवशीं सकाळीं निघाले

ह्या मेरुतुंग मंदिराचा विध्वंस झाल्यानंतर तेथें गेलेल्या नॉट नावाच्या युरोपियन प्रवाशानें लिहिलें आहे कीं—

'अमदाबादला मोठमोठीं मंदिरें आहेत त्यात नगरशेट शांतिदासजींनीं बांधलेलें मंदिर सर्वांत मोठें होतें. औरंगजेबानें त्याची मशीद बनविली त्यात गोवध करून रक्तसिञ्चन केल्यामुळें जैन लोक आता तेथें पूजा करीत नाहींत. चोहों बाजूला ल्हान ल्हान मंदिरें विखुरलेलीं आहेत छत आणि भिंत यावर कोरीव काम आहे परंतु औरंगजेबाच्या धर्मांधपणामुळें सर्व कोरीव मूर्तींचीं नाकें फुटलेलीं आहेत.'

राजकार्यधुरंधर व प्रतिष्ठावान शांतिदास शेटजींजवळ रक्षणासाठीं रजपूत

मध्ये व अरबाची सशस्त्र लहान तुकडी होती, तरीसुद्धा त्याच्यावर आपल्या प्राणाहून प्रिय अशा धर्मस्थानाची विटंबना उघड्या डोळ्यांनी पाहण्याचा भयकर प्रसंग ओढवला. तर मग आज ज्यांच्या हातीं राजसत्ता नाहीं, संघटित शक्तीही त्यांनी निर्माण केली नाही, क्षत्रियत्वाला जे मारले हौत चालले आहेत, असे आम्ही भावी काळात किती पददलित बनू याचे भेसूर चित्र अजूनही आमच्या डोळ्यापुढें येऊं नये ना ?

धन आणि वैभवानें जो समाज विलासी आणि पुरुषार्थहीन बनतो त्याचें कितीही प्रभावी तत्त्वज्ञान असलें आणि त्याच्यामागें जिवंत व प्रभावी संरक्षणशक्ति नसली तर त्या संस्कृतीचें अस्तित्व टिकेल तरी काय ? आमच्या दुबळेपणामुळें आमचे देव दुर्बल ठरतात यापरतें दुर्भाग्य तें काय असायचें ? धन व प्रतिष्ठा याचा खरा उपयोग संस्कृतीची संरक्षकशक्ति निर्माण करणें हें समजून आम्ही संघटित व प्रतिकारक्षम बनूं तो सुदिन.

## ७

शांतिदासजी दिल्लीला पोहोंचताच सुलतान दाराला जाऊन भेटले. सुलतान दारा उतावळा परंतु समजस होता; धर्मांचा कट्टा नव्हता. सहिष्णुता त्याच्या अंगीं बरीच होती. उपनिषदाचें त्यानें फारसींत भाषान्तर करविलें होतें. औरंगजेबाशीं त्याचें सूत जमत नव्हतें त्यामुळें ह्या संधीचा चांगलाच फायदा त्यानें घेण्याचें ठरविलें. शांतिदासजींना त्यानें आश्वासन देऊन शान्त केलें.

तिसऱ्या दिवशीं शांतिदासजींची बादशहा शहाजहानशीं गाठ पडली. शहाजहाननें शांतिदासजींना मोठ्या आदरानें वागविलें.

'क्यों मम्मा, सब तो खैरियत है ?'

'कहाँ की खैरियत जहांपन्हाँ. मेरी सारी जिंदगानी मिट्टीमें मिल गई. सफेत बालकी भी बेइज्जती हुई.' गद्‌गद् स्वरात शांतिदासजी बोलले.

'क्या हुआ ?' बादशाहानें विचारलें. शांतिदासजींनीं सविस्तर हकीकत सांगितली. शांतिदासजींची ती दशा पाहून शहाजहानलाही वाईट वाटलें.

'अब क्या चाहते हो मम्मा ?' बादशहानें प्रश्न केला.

'मंदिर मेरे सुपूर्द होना चाहीये हुजूर.' शांतिदासजींनीं आपली मागणी

माडली.

'यह कैसा हो सकता है ? मस्जिदका मंदिर कैसा बनेगा ?' शहाजदानें विचारलें.

'बादशहा सलामत की मेहेरबानी हो तो क्या नहीं बन सकता ! जहापन्हाँ जहांगीर के हुक्मका क्या ऐसाही अंमल होगा हुजूर ? उन्हींके नेक निगाहसे तो यह मन्दिर बना. क्या आपहींके सल्तनतमें वह तोडा जाय ?' असें बोलून शातिदासजींनीं मंदिरासाठीं जहांगीर बादशहाकडून मिळालेले आज्ञापत्र बादशहाच्या हातीं दिलें. तें आज्ञापत्र पाहून शहाजहान बराच विचारात पडला. शेवटीं त्यानें शातिदासशेटजींना मंदिर परत करण्याचें आश्वासन दिलें. काम पूर्ण होताच शातिदासजी सुलतान दारास भेटले. त्यानीं सर्व हकीकत सविस्तरपणें त्यास सांगितली आणि ते अमदाबादेस परतले. ही आनंदाची बातमी त्यांनीं सर्वांना कळविली. तिसऱ्याच दिवशीं औरंगजेबास दक्षिणेकडे जाण्याचा हुकूम आला, आणि दाराचा हस्तक असलेल्या गैरतखानाची गुजरातचा सुभेदार म्हणून नेमणूक झाली. ता. ३ जुलाई १६४८ रोजीं खालीलप्रमाणें बादशहाचें गुजराथच्या सुभेदारावर फर्मान आलें.

''तोग्रा— अबदुल मुजफर, शाहबुद्दीन महमद साहिब करानसानी शहाजादा बादशाह गाझी.

निशान— आलीशान शहाजादा बुदेल अकबाल महमद दारा सिकोह.

मुद्रा— महमद दारा सिकोह इब्न शहाजहान बादशाह गाझी.

सर्व सुभेदार व मुत्सद्दी यास हल्लीं व इत:पर असे कळविण्यात येतें कीं, अमदाबादचे नगरशेठ शांतिदास याच्या मंदिराबाबत शाहस्तखान उनद्-दुल्मुल्क तर्फे माननीय गैरतखानाला फरमाण्यात येतें कीं—

शाहजादा सुल्तान औरंगजेब बहादुरानें ह्या ठिकाणीं थोड्या महिराफी बनवून मस्जिद बनविली होती. परंतु मुल्ला अबदुल हकीम यानीं आमच्या हुजुरास असें जाहीर केलें आहे कीं दुसऱ्याच्या बळजबरीनें घेतलेल्या इस्टेटींत मशीद बनविणें नियमबाह्य आहे. ही मिळकत शांतिदासची आहे. केवळ कुमारानीं केलेल्या महिराफानीं ती मशीद बनू शकत नाहीं. आम्ही हुकूम करितों कीं वरील इसमास विनाकारण त्रास दिला जाऊ नये. ह्या

मंदिराशी तेथून काढून घेऊन ही मिळकत शांतिदासजींच्या स्वाधीन करावी.

आता असें फर्मावण्यात येतें की शांतिदासजींवर मेहेरनजर म्हणून ही मिळकत शांतिदासजींकडे सोपवावी. त्यांनी तिचा उपयोग घ्यावा. तसेंच धार्मिक क्रिया आपल्या धर्माप्रमाणें सुखानें कराव्या. काही फकीर ह्या जागीं राहतात त्यांना तेथून काढून लावावें. त्यांना शांतिदासजींशी तटाफिसाद करू देऊ नये.

नामदार शहेनशहाना असें सांगण्यात आलें आहे कीं ह्या मंदिराची तोडफोड करतांना काहीं बोहोरी घेऊन गेले आहेत. त्याबाबत असा हुकूम करण्यात येतो कीं ह्या बोहोऱ्यांपासून तें सामान परत घेऊन शांतिदासजींच्या हवाली करावें. जें सामान परत येणार नाहीं त्याच्या किंमतीची भरपाई करून घेऊन शांतिदासजींस द्यावी. हें फरमान अगत्याचें असल्यानें त्याची तात्काळ अमलबजावणी करणें.

ह्या फर्मानात जरामुद्धा फेरफार व अवज्ञा होता कामा नये. हिजरी सन १०५८ च्या जुमाद आखेर शाच्या २१ तारखेस हें फर्मान जाहीर केलं असे."

ह्या मंदिराचा जीर्णोद्धार करण्याची शांतिदासजींची तीव्र इच्छा होती. परंतु जैनसंघात मतभेद पडला. शेवटीं एक मोठें साधुसम्मेलन भरविण्यात आलें. मशीद व गोवध यामुळें त्या जागीं मंदिर बांधणें अयोग्य ठरविलें गेलें. मुसलमानानाही तेथें काहीं करता येणें सरकारी हुकमामुळें अशक्य असल्यानें ह्या टोलेजंग जिनालयाची जागा उजाड पडली आहे.

मिराते आहमदीच्या म्हणण्याप्रमाणें—

ह्या मंदिरात शमर शमर मण वजनाच्या दोन प्रचंड जिनमूर्ति होत्या. जव्हेरीवाड्याच्या आपल्या घराजवळील भुयारात शांतिदासजींनी त्यांची व्यवस्था केली.*

* अमदाबादच्या इतिहासात असा उल्लेख आहे कीं चिंतामणि पार्श्वनाथांच्या मंदिरातील नगरशेठ यांनी आणलेल्या मूर्तींपैकी चिंतामणि पार्श्वनाथाची प्राणप्रतिष्ठा जव्हेरीवाड्यातील सुरजमल यांनी बनविलेल्या मंदिरात झाली असून तीन मोठ्या मूर्ति जव्हेरीवाड्यातील आदीश्वरांच्या मंदिरातील भुयारांत व एक निशापोळमधील मंदिरात हल्ली विद्यमान आहेत

नगरशेट शांतिदास ह्यांचें अमदाबादचें वैभव फारच मोठें होतें. एका टोलेजंग हवेलींत ते राहत. त्याचे तीन विभाग होते. प्रत्येक विभागावर चौकी पहारा असे. सिंहद्वारावर हत्यारबंद अरब ठेवलेले होते. दुसरी चौकी भैय्याची होती. तिसऱ्यावर रजपूत शिपायाचा पहारा होता. राजथाटानें नगरशेटाचें कुटुंब राही. पाचशें गाई म्हशी, पाचशें घोडे असून शिग्राम, रथ, पालख्या ह्यांची तर गणतीच नव्हती. साऱ्या हिंदुस्तानात त्यांच्या पेढीच्या शाखा पसरल्या होत्या. बादशहाची त्याना छडी व मशाल ठेवण्याची खास परवानगी होती.

शेटजींना चार स्त्रिया असून पाच कर्तबगार मुलगे होते. व्यापाराचा सर्व भार त्यांनीं सांभाळला होता. शेटजी निवृत्तिमय जीवन व्यतीत करीत. कोट्यवधि रुपयांची त्यांची मिळकत होती. आपल्या हातानें त्यांनीं दानधर्म खूप केला. मंदिर, धर्मशाळा, संघ ह्यांत त्यांनीं लाखों रुपये खर्च केले. त्याबरोबरच दुष्काळानें पीडित झालेल्या लोकांची त्यांनीं वर्षभर तरतूद केली. पांजरपोळाची स्थापना करून जनावरांचीही सोय लावली. जैन तीर्थांचा कारभारही तेच सांभाळीत. चिंतामणि पार्श्वनाथाच्या मंदिर-विध्वंसापासून शेटजी धार्मिक व्यवहारांत भाग घेत. बाकी सर्व व्यापाराचें काम त्यांचे पुत्र लक्ष्मीचंदशेट पहात. खास प्रसंगींच शेटजींचा सल्ला घेतला जाई.

इ. स. १६५७ त बादशहा शहाजहान फारच आजारी झाले. त्या दुखण्यातून उठण्याची कोणतीच आशा शिल्लक राहिली नाहीं. ह्यामुळें राजगादीसाठीं त्यांच्या मुलांत खटपटी चालू झाल्या. गुजरातमध्यें शहाजादा मुरादबक्ष होता. त्यानें मोठी फौज जमवून दिल्लीवर चाल केली. त्यासाठीं लक्ष्मीचंदशेठकडून साडेपांच लाख रुपये कर्ज काढलें होतें. त्याबद्दल मुरादबक्षानें नवा बादशहा ह्या नात्यानें सनद करून दिली. तींत शांतिदासशेठजींनीं इनाम मिळविलेल्या शत्रुंजय परगण्याला मंजुरी दिली होती (ता. २० जून १६५८).

मुरादबक्षानें उज्जयनी सर केल्यावर लक्ष्मीचंदशेठच्या पैशाची खालीलप्रमाणें फेड करण्याविषयीं गुजरातच्या सुभेदारास लिहिलें:—

सुरतेच्या उत्पन्नातून १॥ लाख रुपये.
खंबायतच्या उत्पन्नातून १॥ लाख रुपये.
भडोचच्या उत्पन्नातून १॥ लाख रुपये.
विरमगावच्या उत्पन्नातून ५० हजार रुपये.
मिठाच्या उत्पन्नातून ५० हजार रुपये.
५५००००

मुरादबक्ष स्वभावानें भोळा होता. 'मला राज्य नको. मी मक्केला जाणार आहे' कुराणावर हात ठेवून शपथपूर्वक उच्चारलेल्या औरंगजेबाच्या ह्या शब्दावर तो फसला. औरंगजेब व मुरादबक्षाच्या संयुक्त फौजा दाराव तुटून पडल्या. सामगडला घनघोर लढाई झाली. औरंगजेबानें कपटानें विश्वासघातानें मुरादला कैद केलें व आलमगीर हा किताब घेऊन स्व बादशहा बनला.

मुराद कैद झाल्यामुळें मुरादच्या आश्वासनाची किंमत राहिली नाही लक्ष्मीचंद शेठजींचे पैसे अडकून पडले. साडेपाच लाखाची रकम! भाऊ विचारात पडले. शेवटीं शांतिदासशेठजींचा सल्ला घ्यावयास ते गेले शांतिदासजी नुकतेच सामायक (गृहस्थाची दैनिक धर्मक्रिया) आटोपू बसले होते. त्यांना ती सर्व हकीकत सांगितली. तें ऐकून शेठजी फार विचारात पडले.

'कोणाला मध्यस्थी घातलें तर?' लक्ष्मीचंदनें सुचविलें.

'मध्यस्थ पैसे खाऊन बसेल एवढेंच. औरंगजेबावर कोणाचेंही वज नाहीं. बेगमा म्हणजे त्याचीं खेळणीं. सरदारांवर तर त्याचा पूर्ण अविश्वास कार्यही तितकेंच महत्त्वाचें आणि निकडीचें आहे. पैशाचा तर प्रश्न आहे परंतु त्याबरोबर जैन तीर्थांच्या रक्षणाचा सवालही आहे. औरंगजेबाच कडु अनुभव आहे मला.' शेठजी बोल्ले.

बराच विचार करून शांतिदासजींनीं शेवटीं दिल्लीला स्वतःच जावयाचें ठरविलें.

'बाबा, ज्यानें तुमच्या हजारों विनंत्या ठोकरीनें उडविल्या, तुमच्या इभ्रतीकडे दुर्लक्ष केलें, त्याच्याकडे तुम्ही पुनः जाणार?' लक्ष्मीचंद म्हणाले.

'हा व्यक्तीचा प्रश्न नाहीं. येथें धर्माचा सवाल आहे. व्यक्तिगत माना

पनाला तिलांजली दिल्याशिवाय सार्वजनिक कामें होत नसतात बेटा.' शांतिदासजी त्यांची समजूत करीत म्हणाले. 'दिल्लीपतीच्या तीन पिढ्या मीं ह्या डोळ्यांनी पाहिल्या आहेत. त्यांची रीतभातहि चांगलीच ओळखतों. मला गेल्याशिवाय गत्यंतरच नाहीं.'

वयाच्या ६९ व्या वर्षी इ. स. १६५८ त शांतिदासजी दिल्लीस गेले. धर्मवीर महात्मा ! प्रवासाच्या त्रासाची त्यांना कसली पर्वा ? दिल्लीपति औरंगजेबाशीं त्यांची मुलाखत झाली.

'ओहो ! शांतिदासजी, बरेच वृद्ध झालात कीं ! कसें काय सर्व क्षेम ना?' चोहीं बाजूंनीं विजयवार्ता येत असल्यानें खुषींत असलेला बादशहा बोलला.

'आपण बादशहा झाल्याचें ऐकून मुद्दाम आपल्या भेटीसाठीं आलों.' नगरशेठ उत्तरले.

'हा ठीक ! तुम्ही म्हणजे ह्या दरबारचे जुने हितचिंतक !'

'जी हुजूर. जहांपन्हाँ अकबरशाह, जहांगीरशाह आणि शहाजहाँ ह्या तिघांनीं बादशाही जव्हेरी व अमीराचा सन्मान देऊन मला ऋणी केलेलें आहे.'

'आणि आम्हींही तो संबंध तसाच कायम ठेवण्याचें ठरविलें आहे.' बादशहा बोलले.

'ती हुजूरची कृपा. पण सरकार, आपल्या चरणीं सादर करण्यासाठीं आणलेली ही फूल नाहीं फुलाची पाकळी स्वीकारण्याची कृपा व्हावी.' शांतिदासजींनीं मोठी रकम पुढें ठेवीत विनंति केली. औरंगजेबाच्या चेहेऱ्यावरील भाव ते निरखीत होते. लढाईमुळें बादशहा पैशाच्या फार तंगींत होता हें त्यांच्या अनुभवी बुद्धीनें केव्हाच ताडलें होतें.

'आपला संबंध ह्यापेक्षाही फार जवळचा आहे.' आवश्यकता नगरशेटवर दारमदार आतून खूप होत बादशहा बोलला.

अपेक्षेप्रमाणें सर्व घडत असल्यानें शेटजींच्या तोंडावर उत्साहाची छटा दिसत होती. ते बोलले,

'केवळ मंदिराला !'

'दुसरें काय काम असणार हुजूर ? फक्त आमच्या तीर्थस्थानांच्या सरक्षणाची सनद देण्याची रीत जहांपनाह अकबरबादशहापासून चालत आलेली आहे तिची अमलबजावणी व्हावी.' शेटजींनीं इच्छा दर्शविली.

दक्षिणच्या सुभेदारीवर असताना अगावर जबाबदारी नव्हती परंतु बादशहा म्हणून राज्य स्थिरस्थावर करण्यासाठीं शांतिदासशेटजींसारख्याची पुष्कळ गरज लागेल हें आलमगीर जाणून होता.

'हें काय बोलता मामा ? खुदाच्या बंदगीस्थानाचें रक्षण करणें हें तर आमचें कर्तव्यच आहे. त्याबद्दल लवकरच सनद पाठवितों. पण आपला व्यापार तर सुरळीत चालला आहे ना ? आमच्या मदतीची जरूर लागेल तेव्हा अवश्य सांगा.' औरंगजेब सहानुभूतीच्या स्वरात बोलला.

'कसला सुरळीत हुजूर ? निकडीच्या वेळीं दिलेलीं कर्जें थकलीं आहेत त्यामुळें परदेशांत आमच्या हुंड्याची किंमत कमी व्हावयाची वेळ आली आहे. म्हणून तर आपल्या चरणीं एवढी छोटीशी भेट सादर करावी लागली. एकत्र करता आली तेवढी रक्कम घेऊन आलों आहें.' शेटजींनीं परिस्थिति सांगितली.

'कोणाकडे थकले आहेत ?' आलमगीरानें प्रश्न केला

'सल्तनतकडे साडेपांच लाख रुपये येणें आहेत. आणि इतर सरदारांतही मोठी रक्कम गुंतली आहे.'

'सल्तनतकडे ?'

'होय सरकार. सुल्तान मुरादबक्षांनीं शहेनशाहतच्या नावावर घेतलेली आहे.'

मुरादबक्षाचें नाव येतांच आलमगीराच्या डोळ्यांत एक विलक्षण आसुरी छटा चमकली. शेटजी मनात तात्काळ उमगले.

'गुजराथचे सुभेदार असताना त्यानीं मागणी केली. सत्तेपुढें आमचा शहाणपणा कसा चालणार ? आम्ही व्यक्तीला पैसे दिले नाहींत, पादशाहीला दिलेले आहेत. ही सहीशिक्याची निशाणी बघा पाहिजे तर हुजूर.' शांतिदासजी सहीशिक्का दाखवीत बोलले.

'ठीक आहे. अर्ज देऊन जा. लवकरच निर्णय लागेल.' विचार करीत ᐧ बोलला.

अशाप्रकारें कामगिरी पार पाडून शांतिदासजी अमदाबादेस परतले. थोड्याच दिवसांत दिल्लीहून एक फर्मान बाहेर पडलें.

तोग्रा— शाहमहंमद औरंगजेब बहादूर गाझीचें महान् फर्मान.

'आमची मेहेरबानी प्राप्त करणार रहिमतरां यास फर्मावण्यात येतें कीं शांतिदासजीला महान् पादशाहाच्या भेटीचा मोठा सन्मान प्राप्त झाला होता. त्याना राजदरबारातून अमदाबादला जाण्याची नुकतीच परवानगी देण्यात आली आहे. त्यानीं असें विदित केलें कीं सुल्तान मुरादबक्षानें त्याच्याकडून साडेपाच लाख रुपये घेतलेले होते. त्यापैकीं साडेचार लाख रुपये शांतिदासचा पुत्र लक्ष्मीचंद याच्या नावानें घेतले आहेत. रु.६२००० त्याचा भागीदार रत्नीदास याजकडून व ८० हजार रुपये त्याच्या सोयऱ्याधायऱ्याकडून घेतले. ह्यामुळें शांतिदासला फार त्रास सहन करावे लागले.

आमच्या उदारतेच्या आणि मेहेरबानीच्या छायेखालीं असलेल्या त्याना एक लाख रुपये राज्याच्या तिजोरींतून देण्यात यावेत. बाकीच्या रकमेबाबत संतोषकारक पुरावा मिळवावा. तसेंच एक लाख रुपये सुभेदार शहानवाजची परवानगी घेऊन ताबडतोब देऊन टाकावे. ह्यामुळें त्याना आपला धंदा व्यवस्थित करता येईल.'

१० आगस्ट १६५८ सालचें हें फर्मान होतें. त्यानतर लागलीच ३० जानेवारी १६५९ मध्यें दुसरें फर्मान निघालें.

आमच्या वर्तमान व भावी अधिकाऱ्याना कळविण्यात येते कीं शांतिदासाचा पुत्र लक्ष्मीचंद यानें जाहीर केलें कीं त्याची मोठी रक्कम ह्या प्रांतातील अधिकाऱ्यात गुंतलेली आहे. ते ती रक्कम देत नाहींत आणि खोट्या सबबी दाखवितात. त्यामुळें ती रक्कम मिळण्यासाठीं त्यानीं सल्तनतपुढें विनंति केली आहे म्हणून फर्मावण्यात येतें कीं जें साऱ्या जगात मान्य आहे अशा या फर्मानाप्रमाणें पूर्ण तपास करून हिशेब व दस्तऐवज तपासून त्याना पैशाची भरपाई करविण्यात मदत केली पाहिजे. कोणीही विनाकारण पैसे दडपून बसणार नाहीं याकडे लक्ष द्यावें.

शांतिदासजींनीं आपल्या उतारवयात दिल्लीचा प्रवास केला त्याचें फळ म्हणून हीं फर्मानें मिळालीं. तीर्थरक्षणाचें फर्मान न मिळाल्यानें ते जरा सचिंतच होते. इ. स. १६५९ त हे धुरंधर धर्मवीर निजधामास गेले.

'दुसरें काय काम असणार हुजूर ? फक्त आमच्या तीर्थस्थानाच्या संरक्षणाची सनद देण्याची रीत जहांपनाह अकबरशहापासून चालत आलेली आहे तिची अमलबजावणी व्हावी.' शेटजींनी इच्छा दर्शविली.

दक्षिणच्या सुभेदारीवर असताना अशावर जबाबदारी नव्हती परंतु बादशहा म्हणून राज्य स्थिरस्थावर करण्यासाठी शांतिदासशेठजींसारख्यांची पुष्कळ गरज लागेल हें आलमगीर जाणून होता.

'हें काय बोलता मामा ? खुदाच्या बंदगीस्थानाचें रक्षण करणें हें तर आमचें कर्तव्यच आहे. ह्याबद्दल लवकरच सनद पाठवितों. पण आपला व्यापार तर सुरळीत चालला आहे ना ? आमच्या मदतीची जरूर लागेल तेव्हां अवश्य सांगा.' औरंगजेब सहानुभूतीच्या स्वरांत बोलला.

'कसला सुरळीत हुजूर ? निवडीच्या वेळीं दिलेलीं कर्जे थकलीं आहेत. त्यामुळें परदेशांत आमच्या हुंड्यांची किंमत कमी व्हावयाची वेळ आली आहे. म्हणून तर आपल्या चरणीं एवढी छोटीशी भेट सादर करावी लागली. एकत्र करतां आली तेवढी रक्कम घेऊन आलों आहे.' शेटजींनी परिस्थिति सांगितली.

'कोणाकडे थकले आहेत ?' आलमगीरानें प्रश्न केला.

'सल्तनतकडे साडेपांच लाख रुपये येणें आहेत. आणि इतर सरदारांतही मोठी रक्कम गुंतली आहे.'

'सल्तनतकडे !'

'होय सरकार सुल्तान मुरादबक्षांनीं शहेनशाहतच्या नांवावर घेतलेली आहे.'

मुरादबक्षाचें नांव घेतांच आलमगीराच्या डोळ्यांत एक विलक्षण आसुरी छटा चमकली. शेटजी मनांत तत्काळ उमगले.

'गुजराथचे सुभेदार असतांना त्यांनीं मागणी केली. सत्तेपुढें आमचा शहाणपणा कसा चालणार ! आम्ही व्यापारी पैसे दिले नाहींत, पादशाहीला दिलेले आहेत. ही सद्दीविकल्याची निशाणी बघा पाहिजे तर हुजूर.' शांतिदासजी सहीशिक्का दाखवीत बोलले.

'ठीक आहे. अर्ज देऊन जा. लवकरच निर्णय होईल.' विचार करीत आलमगीर बोलला.

अशाप्रकारें कामगिरी पार पाडून शांतिदासजी अमदाबादेस परतले. थोड्याच दिवसात दिल्लीहून एक फर्मान बाहेर पडलें.

तोग्रा— शाहमहमद औरंगजेब बहादूर गाझीचें महान् फर्मान.

'आमची मेहेरबानी प्राप्त करणार रहिमतखा यास फर्मावण्यात येतें कीं शांतिदासजीला महान् पादशहाच्या भेटीचा मोठा सन्मान प्राप्त झाला होता. त्याना राजदरबारातून अमदाबादला जाण्याची नुकतीच परवानगी देण्यात आली आहे. त्यानीं असें विदित केलें कीं सुल्तान मुरादबक्षानें त्याच्याकडून साडेपाच लाख रुपये घेतलेले होते. त्यापैकीं साडेचार लाख रुपये शांतिदासचा पुत्र लक्ष्मीचंद याच्या नावानें घेतले आहेत रु.६२००० त्याचा भागीदार रखीदास याजकडून व ८० हजार रुपये त्याच्या सोयऱ्या-धायऱ्याकडून घेतले. ह्यामुळें शांतिदासला फार त्रास सहन करावे लागले.

आमच्या उदारतेच्या आणि मेहेरबानीच्या छायेखालीं असलेल्या त्याना एक लाख रुपये राज्याच्या तिजोरींतून देण्यात यावेत. बाकीच्या रकमेबाबत संतोषकारक पुरावा मिळवावा. तसेंच एक लाख रुपये सुभेदार शहानवाझची परवानगी घेऊन तावडतोब देऊन टाकावे. ह्यामुळें त्याना आपला धंदा व्यवस्थित करता येईल.'

१० आगस्ट १६५८ सालचें हें फर्मान होतें. त्यानंतर लागलीच ३० जानेवारी १६५९ मध्यें दुसरें फर्मान निघालें.

आमच्या वर्तमान व भावी अधिकाऱ्याना कळविण्यात येतें कीं शांतिदासाचा पुत्र लक्ष्मीचंद यानें जाहीर केलें कीं त्याची मोठी रक्कम ह्या प्रांतातील अधिकाऱ्यात गुंतलेली आहे. ते ती रक्कम देत नाहींत आणि खोट्या सबबी दाखवितात. त्यामुळें ती रक्कम मिळण्यासाठीं त्यानीं सल्तनतपुढें विनंति केली आहे म्हणून फर्मावण्यात येतें कीं जें साऱ्या जगात मान्य आहे अशा या फर्मानाप्रमाणें पूर्ण तपास करून हिशेब व दस्त-ऐवज तपासून त्याना पैशाची भरपाई करविण्यात मदत केली पाहिजे. कोणींही विनाकारण पैसे दडपून बसणार नाहीं याकडे लक्ष द्यावें.

शांतिदासजींनीं आपल्या उतारवयात दिल्लीचा प्रवास केला त्याचें फळ म्हणून हीं फर्मानें मिळालीं. तीर्थरक्षणाचें फर्मान न मिळाल्यानें ते जरा सचिंतच होते. इ. स. १६५९ त हे धुरंधर धर्मवीर निजधामास गेले.

शातिदासजींनीं सदमी मिळविली परंतु तिला दासी म्हणून राबविलें; स्वतः तिचे गुलाम बनले नाहींत. धनिक हा लोकांचा विश्वस्त असून लोक कल्याणासाठीं त्याचा पैसा असतो. हा धर्मवीर शातिदासजींचा महान् आदर्श विलासाकडे झुकत चाललेला धनिकवर्ग आपल्यापुढें ठेवील का! इ. स. १६६० औरंगजेबानें तीर्थरक्षणाचें फर्मान काढलें.

'सहस्रकिरणाचा पुत्र शातिदास जव्हेरी जो जैन आहे त्यानें बादशहापुढें खास मेहेरबानीची मागणी केली. सैन्याच्या कूच करण्याच्या वेळीं त्यानीं अन्नादि सामग्री पुरविण्याची मोठी कामगिरी बजाविली आहे. आणि त्याचा मोबदला म्हणून कृपादृष्टीची मागणी केली आहे. ह्यामुळें पालीताणा गाव व त्यातील मंदिर जें शत्रुंजय डोंगराच्या नावानें ओळखलें जातें तें सर्व आम्ही उपरोक्त जव्हेरी याना इनाम देत आहोंत. तेथें जें घास होईल त्यात श्रावकाच्या जनावरानीं चरावें. गोवऱ्या आणि लाकडेंही श्रावकाच्या उपयोगात यावीं पुढें होणाऱ्या कोणींही अधिकाऱ्यानें ह्यात फरक करू नये.

ह्याशिवाय जुनागडमध्यें गिरनार व शिरोहींत आबू नावाचा पर्वत आहे. हे दोन्ही पर्वत आम्ही शातिदास जव्हेरींस देत आहोंत. ह्या फर्मानाच्या द्वारा अधिकाऱ्याना फर्मावण्यात येतें कीं त्याचा उपभोग त्याना घेऊं द्यावा. कोणत्याही राजानें तक्रार करूं नये किंवा त्याच्याजवळ दरसाल सनदेची मागणी करू नये.

याचा जो कोणी भंग करील तो ठपक्यास पात्र होऊन अल्लाचा गुन्हेगार ठरेल. त्यास याबाबत वेगळी सनद देण्यात आली आहे.

पण आपल्या आयुष्याच्या शेवटच्या पर्यंत घेतलेल्या श्रमाचें सार्थक झालेलें पाहण्यास नगरशेट इहलोकीं राहू शकले नाहींत. लंघ्यते न खलु कालनियोगः । दुसरें काय!

अशा थोर, दीर्घोद्योगी आणि कर्तबगार धर्मवीराच्या चरित्रश्रवणानें आपलीं अंतःकरणें पुनीत होवोत.

# अकबरप्रतिबोधक जगद्‌गुरु हीरविजयसूरि

## १

जगाचें नंदनवन म्हणजे हिंदुस्थान. हिंदुस्थानच्या सुसंस्कृत भूमीमध्यें, पुण्यभूमीमध्यें अनेक जगद्वंद्य ज्योतिर्धराचा जन्म झाला आहे. जगाच्या पुरातन संस्कृतीमध्यें भारतीय संस्कृतीची गणना करण्यात येते. ह्याच भूमीमध्यें हिंदुधर्म, बौद्धधर्म आणि जैनधर्मासारख्या महान् धर्मांचा उदय झाला आहे. पौर्वात्य संस्कृतीचा प्रकाश भारतवर्षानें सर्व जगास दिला आहे.

जेव्हा जगाच्या कित्येक भागात अंधःकाराचें, अज्ञानाचें साम्राज्य पसरलें होतें, इतर ठिकाणचे मानव जेव्हा जंगली अवस्थेमध्यें होते, त्या समयीं भारताची प्रजा प्रगतीच्या उच्च शिखरावर होती.

भारताचें ऐश्वर्य आणि समृद्धि जगास थक्क करून सोडीत. ह्या नंदनवनामध्यें सर्व जगास पुरें पडेल इतकें धनधान्य पिकत असे. नाना-प्रकारच्या सुंदर फुलाफळांनीं ही भूमि शृंगारलेली होती. गंगा, यमुना, सिंधु यांच्या पवित्र पाण्यानें ही भूमि, ही फुलबाग सजवली होती. पुरातन काळापासून ही भूमि सुवर्णभूमि म्हणून प्रसिद्ध आहे. येथील भूगर्भामध्यें सोनें, रुपें इत्यादि अनेक धातु सापडत. अशा या समृद्ध, सुसंस्कृत नंदन-वनानें मुसलमानांना आणि नंतर युरोपियनांना आकर्षिलें यात आश्चर्य तें काय ?

हिंदुस्थानावर प्रथम हल्ला परकीयाकडून सातव्या शतकात झाला. रज-पूत राजाचा पाडाव करून मुसलमानांनीं शक्तीच्या जोरावर आपली सत्ता हळूहळू प्रस्थापित केली. संपत्तीची लालसा आणि ईस्लामी धर्माचा प्रसार या ध्येयानें प्रेरित होऊन त्यांनीं हिंदुस्थानावर स्वारी केली होती. हें ध्येय साध्य करण्यासाठीं त्यांनीं कित्येक लढाया केल्या, कित्येक अत्युतम मंदि-राचा नाश केला, आणि अन्यधर्मीयावर जिजिया कर लादून अन्य रीतीनें त्यांचा छळ केला. त्या काळीं मुसलमान राजाकडून प्रजेला ज्या हाल-

अपेक्षा सहन करावा लागल्या त्याला हिंदुस्थानच्या इतिहासात तोड नाही.

कत्तल व क्रौर्य यांनी भरलेल्या आठशें वर्षांच्या कारकीर्दीनंतर अकबर नावाचा मोंगल बादशहा इ. स. १५५६ मध्यें उदयास आला. स्वत त्या कर्तृत्वानें हिंदुस्थान पादाक्रांत करणाऱ्या बाबराचा तो नातू होता. पण आपल्या बापाच्या (हुमायुनाच्या) कारकीर्दीत निष्फळित झालेलें हें साम्राज्य स्वत:च्या पराक्रमानें व पुरुषार्थानेंच त्यानें परत मिळविलें. तो धर्मानें मुसलमान होता तरी त्याच्याजवळ हिंदु मुसलमान असा भेदभाव नव्हता. तो जसा पराक्रमी व प्रजावत्सल होता तसाच तो मोठा विद्वानांचा चाहता आणि धर्मजिज्ञासु होता. आणि त्यामुळें हिंदुस्थानच्या इतिहासात अकबरास एक विशिष्ट स्थान मिळालें आहे. मुसलमानी बादशहामध्यें नव्हे तर हिंदुस्थानामध्यें जे जे पराक्रमी आणि न्यायी सम्राट् होऊन गेले त्यामध्यें अकबराची गणना प्रामुख्यानें करण्यात येते.

हुमायुनानंतर भारतवर्षाची स्थिति सुधारण्यासाठीं आणि प्रजेचें पुत्राप्रमाणें पालन करण्यासाठीं जशी एका सम्राटाची– अकबराची– जरूरी होती तशीच जिजिया कराचें दु:ख नाहीसें करण्यासाठीं, हिंदुस्थानामध्यें सुरू असलेल्या हिंसेचा नंगा नाच थांबविण्यासाठीं आणि जैनांना मार्गदर्शन करून त्यांच्या तीर्थस्थानाचें रक्षण करण्यासाठीं एका महात्म्याची अत्यंत जरूरी होती

विधीनें हें काम हीरविजयसूरींकडे सोंपविलें होतें. त्यांचा जन्म पाल्नपूर मुक्कामीं कुराशाह आणि नाथीबाई यांच्या पोटीं झाला. मार्गशीर्ष शुद्ध नवमीचा तो दिवस होता. विक्रम संवत १५८३ (इ. स. १५२७) होतें.

## २

शैले शैले न माणिक्यं मौक्तिकं न गजे गजे ।
साधवो नहि सर्वत्र चन्दनं न वने वने ॥ —भर्तृहरि.

केव्हां ते आठ दहा वर्षांचे असतील नसतील. त्यांनीं आपल्या वडिलांस ..., 'बाबा, आपल्या कुळातून कोणी साधु झाला आहे का?' कुराशाहहीरजींच्या प्रश्नाचें जरा आश्चर्य वाटलें आपल्या प्रश्नाचें काहींच उत्तर ... नाहीं असें पाहून हिरजी म्हणाले, 'बाबा, ज्या घराण्यात कोणी

साधु पुरुष अंतरला नाहीं तें घराणें कसें उच्च समजावें ! कुणीतरी साधु होऊन कुळास दिपविलें पाहिजे.'

वरील उद्गार काढणाऱ्या हीरजींचें जीवन कसें रंगविलें जाणार आहे याची कुराशाहास कल्पनाही नसेल. आपला धाकटा मुलगा दोन हजार साधूंचा प्रमुख होईल, नुसता प्रमुख नाहीं तर अखिल जैनसमाजाची एक वंदनीय विभूति म्हणून तो प्रसिद्धि पावेल, त्याची मूर्ति होऊन तो पूजला जाईल, यवन बादशहा अकबर त्याचा सन्मान करील साधा सन्मान नाहीं तर त्याचा दिव्य उपदेश ऐकून त्यास 'जगद्गुरु' पदवी अर्पण करील आणि जीवहिंसेला प्रतिबंधक अशीं फर्मानें काढील, असें कुराशहास स्वप्नांत तरी वाटलें असेल का ? पण बालहीरजींनीं आपले बोल मात्र खरे केले.

हीरजी अवघे अकरा वर्षांचे असताना त्यांचे वडील कुराशाह आणि मातोश्री नाथींबाई वारली. हीरजींच्या थोरल्या बहिणीनें– विमलबाईनें– हीरजीला आपल्या सासरीं (पाटण) नेलें पाटण येथील जैनमय वातावरणात हीरजींचे मूळचे धार्मिक संस्कार अधिक दृढ झाले. जैननगरी म्हणून प्रसिद्ध पावलेल्या पाटणमध्यें जेव्हा हीरजींनीं पाय ठेवला तेव्हा आचार्य विजयदानसूरींचें वास्तव्य तेथेंच होतें. सोळाव्या शतकाच्या प्रारंभीं निरनिराळे पंथ* निघून श्वेतांबरमताच्या साम्राज्यांत जी छिन्न भिन्नता झाली होती आणि श्रावकाच्या व साधूंच्या आचारात जी शिथिलता आली होती ती नाहींशी करून समाजास पुन्हा एकत्रित करण्याचें ज्यांनीं महान् काम केलें अशा आनंदविमलसूरींचे ते शिष्य होते विजयदानसूरींच्या सहवासात जसजसे हीरजी येऊ लागले तसतसे संसारत्यागाचे विचार त्यांच्या मनात येऊ लागले. खेळण्यातून त्यांचें मन उडून गेलें. पाठशाळेमध्यें त्यांचा बराच वेळ जाऊ लागला. एखाद्या भाविक श्रावका

* आनंदविमलसूरि इ. स. १४५२ पासून इ स १५४६ पर्यंत श्वेतांबर जैन समाजामध्यें पांच पंथ निघाले ते असें (१) लोंकाशाहाचें लोंकामत ह्या पंथास 'स्थानकवासी' असें दुसरें नांव आहे (२) कटुकाचें कटुकमत (३) विजयाचें विजयमत (४) पार्श्वचंद्राचें पार्श्वचंद्रमत. (५) सधममत या पांच पंथांनीं फक्त पंदरिया पंथाची वाढ झाली

प्रमाणें ते सामायिक, प्रतिक्रमण आणि देवपूजा करू लागले सतांचा सहवास, वाचनपठनाचा व्यासंग आणि अरिहंताबद्दल अंतर्यामी असलेली आसक्ति ह्यामुळें हीरजींच्या बालमनात क्रांति घडून आली त्यांस संसार असार वाटू लागला तसें पाहिलें तर संसार अजून त्यांनी पाहिलाही नव्हता पण संसाराची निरर्थकता मात्र त्या मध्य अभ्यास पटली होती

आपल्या मनांतील दीक्षेसंबंधींच्या भावना त्यांनी विमलाबाईपुढें प्रकट केल्या विमलाबाई रडू लागली आपल्या भावाच्या दीक्षेमुळें आपणांस तो अंतरणार हा विचार तिला असह्य होऊ लागला इतर पडील बहिणीं प्रमाणें पोरका झालेल्या आपल्या धाकल्या भावाविषयीं तिचे विचार होते-हीरजी मोठा होईल, विवाह करून संसार थाटील आणि व्यापारधंदा करून अगणित संपत्ति मिळवील, अशा कल्पनासाम्राज्यात विमलाबाई वावरत होती तिला बिचारीला काय माहीत की हीरजी हातात तराजू धरण्यास जन्मले नव्हते ! अगणित पैका मिळवून शेटजी होऊ इच्छीत नव्हते ! तर *राजीया, वजिया, रामजी, इंद्रजी, मोमकरण, उदयकरण सारख्या गर्भश्रीमंत श्रावकांना पूज्य होण्यासाठीं आणि अकबराच्या दुर्बारावर प्रभाव पाडण्यासाठीं ते अवतले होते ! दु खाचा वेग ओसरल्या नंतर ती हीरजींस म्हणाली, 'ही दीक्षा हा पोरखेळ नाहीं ती तलवारीच्या धारेवरील कसरत आहे यात कायमचें घर सोडावें लागतें पायीं प्रवास

* राजीया व वजिया हे बंधुद्वय मूळचे खंबायतचे रहिवासी पण गोव्यामध्यें व्यापारासाठीं राहत असत त्यांनी पांच मोठाली जिनमंदिरें बांधली मोठमोठाले संघ काढले एकंदर ३३ लाख रुपये दानधर्मात खर्च करून त्यावेळच्या धर्मामध्यें त्यांचें चांगलें वजन होतें ते सूरीश्वराचे श्रावक होत

रामजी व इंद्रजी दो ही गंधारचे रहिवासी इंद्रजीस दीक्षा घेण्याची फार इच्छा होती पण त्याचा भ ऊ नाथा याने विरोध करून दीक्षा घेऊ दिली नाहीं इंद्रजी फार श्रीमंत होता स्वत च्या आयुष्यामध्ये ३६ प्रतिष्ठा महोत्सव त्यानें साजरे केले होते रामजी हाही सूरीश्वरांचा भक्त होता त्यान सिद्धाचलजीवर एक मंदिर बांधले

मोमकरण व उदयकरण दो ही खंबायतचे रहिवासी उदयकरणानें सूरीश्वरांच्या स्वर्गवासानंतर सिद्धाचलजीवर सूरीश्वरांच्या पादुकांची स्थापना केली शेष सूरी-श्वरांच्या अकबराच उपदेश करून केलेल्या कार्याचें थोडक्यात वर्णन दिलें आहे

करावा लागतो. केशलोचन करावें लागतें. आठ आठ दिवसाचे उपवास करावे लागतात. हें तुझ्यानें कसें जुळेल? यावर हीरजी उत्तरले, 'बेन, संसारामध्यें एकदा मनुष्य अडकला म्हणजे त्याच्या हातून धर्मसाधना होत नाहीं. आणि उत्कृष्ट प्रमाणात धर्मसाधना झाली नाहीं म्हणजे मोक्ष लवकर मिळत नाहीं. अन् मला तर त्वरित मोक्ष मिळवायचा आहे, तेव्हा उत्कृष्ट प्रमाणात त्याग करण्यास मला तयार झालेंच पाहिजे.' विमलबाईला हें तत्त्वज्ञान पटत होतें कारण ती एक सुसंस्कृत श्राविका होती. प्रश्न होता फक्त मोह आवरण्याचा. पण हीरजीच्या निश्चयाच्या बळापुढें विमलबाईचें काहीं चाललें नाहीं. शेवटीं मातृप्रेमावर वीतरागावरील भक्तीनें विजय मिळविला. विवेकानें मोहास जिंकलें. विमलबाईची संमति मिळताच हीरजींनीं आपलें हृदय गुरुमहाराजापुढें उघडें केलें. त्याच्या मनाचा कल पाहून वैराग्य आणि वीतरागाचे उपासक– विजयदानसूरींनीं– त्यास आपलें शिष्य करण्याचें ठरविलें. दीक्षोत्सवसमारंभ मोठ्या थाटामाटात वि. स. १५९६ मध्यें झाला.

तेरा वर्षांचे बाल हीरजी बालसाधु झाले. हीरजींचे हीरहर्ष झाले. खूप दिवस निघून गेले. हीरहर्षांनीं तारुण्यात प्रवेश केला. तारुण्य म्हणजे विकाराचें घर. हीरहर्षांनीं विकाराना वीतरागाची सेवा करण्यात वळविलें. सत्ता आणि संपत्ति मिळविण्याच्या मानवी लालसेचें त्यांनीं अहिंसारूपी वृक्षास पाणी घालण्यात, फोफावण्यात रूपान्तर केलें. हीरहर्षांचें घर आता चार भिंतींचें राहिलें नाहीं. चारी दिशा जिनें व्यास केल्या आहेत अशी अखिल चराचर जीवसृष्टि हीच त्याची निवासभूमि झाली. जागा वाढली म्हणजे पसारा वाढतो. निवासभूमीचा व्याप वाढल्यावर जबाबदारी अनेक पटीनें वाढते हें हीरहर्षांस ठाऊक होतें. जबाबदारी पार पाडण्यासाठीं जय्यत तयारी चालविली. धर्मशास्त्राचा–विशेषतः आगमाचा* आणि वाङ्मयशास्त्राचा अभ्यास त्यांना गुरुपाशीं केला होता. पण महत्त्वाकांक्षी व तरुण हीरहर्षांचें हृदय सेनापतीच्या पदाची हाव धरणाऱ्या एखाद्या सैनिकाप्रमाणें होतें. सेनापतीस रणांगणावरील डाव माहीत असतात. लष्करी

* आगम = जैनांचे धार्मिक ग्रंथ.

शिक्षण घेऊन तो तरबेज झालेला असतो. आचार्यांना साधूला शिकवावें लागतें. जनसमूहावर प्रभाव पाडावा लागतो. तेव्हा शास्त्राचा सखोल अभ्यास असल्याशिवाय आपली प्रगति होणार नाहीं हें पाहून अवगत नसलेल्या न्यायशास्त्रामध्यें प्रभुत्व मिळविण्यासाठीं त्या वेळीं नैयायिक पंडिताचें आगर असलेल्या देवगिरीस (दौलताबादेस) आपल्या दोन गुरु बंधूंबरोबर जाण्याचें त्यांनीं ठरविलें. देवगिरीमध्यें तर्कपरिभाषा, मित भाषिणी, शशधर, मणिकंठ इत्यादि ग्रंथांचें त्यांनीं अध्ययन केलें. व्याकरण, ज्योतिष, रघुवंशादि काव्यांत त्यांनीं निपुणता मिळविली देवगिरी मध्ये विद्याभ्यासासाठीं झालेला खर्च देवगिरीच्या सघानें आणि तेथील प्रमुख शेठ देवसीशाह यानीं केला.

धर्मशास्त्र, वाङ्मय आणि न्याय यामध्यें अशा रीतीनें पारंगत झाल्या नंतर वि. सं १६०७ मध्यें हीरहर्षास पंडितपद अर्पण करण्यात आलें. तीन वर्षांनंतर त्यांचें असामान्य वैराग्य, अमोघ वक्तृत्व आणि असाधारण विद्वत्ता पाहून त्यांच्या गुरूंनीं त्यांना आचार्य केलें तेव्हापासून ते हीर-विजयसूरि म्हणून ओळखण्यात येऊं लागले. आचार्यपद मिळाल्यानंतर बारा वर्षेपावेतों सूरींना विजयसेनसूरींचा सहवास लाभला या सहवासांत त्यांनीं तत्कालिन धार्मिक आणि राजकीय प्रवाहाचा सूक्ष्म अभ्यास केला. गुरु स्वर्गस्थ झाल्यानंतर जैनशासनसेवेची संपूर्ण धुरा सूरीश्वरांच्या शिरावर पडली.

नंतर सूरीश्वर आपल्या शिष्यांसहित धर्मोपदेश देण्यासाठीं गुजरातमध्यें ठिकठिकाणीं विहार करू लागले. त्या वेळीं अकबर बादशहानें तो सबंद प्रांत आपल्या ताब्याखालीं घेऊन त्याचा राज्यकारभार करण्यासाठीं ठिक-ठिकाणीं सुभेदार नेमले होते. नवीन राजवट सुरू झाल्यामुळें आणि अकबरानें नेमलेले सुभेदार लहरी व स्वतंत्र असल्यामुळें सबंद प्रांतांत अराजकता माजली होती सूरीश्वरांसारखे सत्त पुरुष या बखेड्यांत होरपळून निघाले पण सत्तास्थागानंतर त्यांनीं सुखाची लालसा सोडली होती अशा सूरीश्वरांना या दुःखद प्रसंगाबद्दल उद्वेगही वाटत नव्हता. ते स्थितप्रज्ञ झाले होते.

३

संताच्या जीवनाकडे दृष्टि फेकल्यास एक गोष्ट प्रामुख्यानें आढळते. ती ही की सज्जनतेचा, सुसंस्कृतीचा सुगंध त्यांच्यामुळें सारखा वातावरणात, लोकसमूहात दरवळत राहतो. आणि तो सारखा दरवळत राहावा हीच त्यांची आत्यंतिक इच्छा असते. पण याच इच्छेसाठीं लोकांचें कल्याण व्हावें याच प्रखर भावनेसाठीं त्यांना स्वकीयांकडून विरोध होतो. केव्हा केव्हा त्यांना स्वत च्या प्राणावरही उदार व्हावें लागतें

आपल्या सात्त्विक उपदेशासाठीं महान् तत्त्वज्ञानी सॉक्रेटीसाला विषाचा प्याला प्यावा लागलाच कीं नाहीं? ख्रिश्चन धर्माच्या प्रणेत्याला फासावर लटकावें लागलें! तुकारामाच्या अभंगानीं आणि भक्तीनें लोक वेडावले. पण तुकारामाची महत्ता मुंबाजीस आणि सालोमालोस कुठें सहन झाली? नरसी मेहतास हरिजनामध्यें मिसळल्यामुळें आपल्या सख्ख्या भावाच्या आणि भावजयीच्या व समाजाच्या शिव्या खाव्या लागल्या

इतर संताप्रमाणें सूरीश्वरांवरही कित्येक दु खद प्रसंग त्यांच्या पूर्वायुष्यात ओढवले. एकान्तवास, बादशाही शिपायाचा सतत ससेमिरा आणि सुभेदाराची करडी नजर यामध्यें त्यानीं कित्येक दिवस कढले. पण प्रत्येक ठिकाणीं प्रसंगावधान राखून त्यानीं आपली सुटका करून घेतली आहे.

खंबायतमध्यें ह्यांचा एकदा मुक्काम असताना सकल श्रीसंघ पूजा, प्रवचन आणि प्रतिक्रमणात तन्मय झाला होता. पण रत्नपाल नावाच्या श्रावकाची परिस्थिति निराळी होती. आपल्या धाकट्या मुलाच्या (रामजीच्या) आजारामुळे रत्नपालाच्या घरातील मंडळींचें सर्व गोष्टींवरून मन उडालें होतें. रामजी वाचेल कीं नाहीं याची शाश्वति कोणास वाटत नव्हती. पण रामजीचें नशीब पडलें शिकदर! त्यास लवकर आराम पडल्यामुळें रत्नपाल आपल्या नियमानुसार सुरीश्वराचें प्रवचन ऐकण्यास आश्रमात जाऊं लागला. सूरीश्वरांचें शैलीयुक्त प्रवचन, प्रवचनात संसाराच्या असार स्वरूपाचें केलेलें विशदीकरण आणि त्यातून निघालेले साधु जीवनाचें सुंदर चित्र यामुळे हळव्या बनलेल्या रत्नपालास स्मशानवैराग्य (?) प्राप्त झालें एकदा सूरीश्वराजवळ येऊन तो म्हणाला, 'आचार्यश्री, आपला उपदेश फार बोधक आणि कल्याणकारक असतो. ह्यामुळें वैराग्याचे विचार

माझ्या डोक्यात सारखे घोळत असतात. रामजी मोठा झाला म्हणजे त्यास दीक्षा द्यावी असें मी ठरविलें आहे.' समापण येथें सर्व शत्रू सुरीश्वर काहीं दिवसांच्या वास्तव्यानंतर निघून गेले. काहीं वर्षांनंतर ते परत खंबायतमध्यें आले असताना त्यांनी रत्नपालास आपल्या आश्वासनाची आठवण करून दिली. पण रत्नपाल आपल्या वचनास विसरला. त्याच्या घरची मंडळी सूरीश्वरांवर राग काढू लागली. वारा कोणत्या दिशेनें वाहतो हें पाहून सूरीश्वरांनी आपलें धोरण बदललें. पण शेवटीं एक मोठा प्रसंग त्यांच्यावर गुदरला. रामजीच्या नातलगानें खंबायतच्या सुभेदाराचे कान भरले खानास त्यानें सांगितलें, 'आठ वर्षांच्या कुमारास सूरीश्वर साधु बनवीत आहे तेव्हा त्यास अटक होणें जरूर आहे.' हलक्या कानाच्या सुभेदारानं सूरीश्वरांना पकडण्याचा हुकूम केला. त्याचा कसून तपास करण्यात आला. पण ते सापडले गेले नाहींत. तेव्हा रत्नपाल व रामजीस* खानापुढें खेचण्यात आलें. रामजीचें सुंदर रूप आणि लहान वय पाहून खान रत्नपालास म्हणाला, 'काय रे, तू याला फकीर बनवितोस? याद राख माझ्याशी गाठ आहे.' रत्नपालानें मोठी याकुळत करून स्वतःची सुटका करविली. या भानगडींत सूरीश्वरांना तेवीस दिवसांचा एकान्तवास सहन करावा लागला. आपल्या पाठीमागें धर्माचा दीपक कोणीतरी प्रज्वलित ठेवावा अशी सूरीश्वराची उत्कट इच्छा सुभेदाराच्या कायद्यात गुन्ह्याच्या वर्गांत येऊ लागली. त्यातून सुटका होण्यासाठीच सूरीश्वरांना एकान्तवासाचा मूर्दड!

दुसरें संकट उद्भवलें तें असें. सूरीश्वराबद्दल एका हितशत्रूनें अमदाबादच्या सुभेदाराचें—शिहाबखानाचें—मन कलुषित केलें. सूरीश्वरांना तातडीनें कोर्टांत खेचण्यात आलें. पाऊस न पाडण्याचा त्यांच्यावर आरोप ठेवण्यात आला होता. त्याबद्दल त्यांना जाब विचारण्यात आला! जणू काय पाऊस पाडणें अथवा पडण्यास अटकाव करणें सूरीश्वरांच्याच हातीं होतें! आपल्या जबानींत सूरीश्वर म्हणाले, 'आम्ही पाऊस बंद कां करावा? पाऊस न पडल्यानें लोक दुःखी होतील. ज्यामुळें जनता दुःखी होईल असानें आम्हास काय लाभ होणार?' सूरीश्वराच्या सरळ उत्तरानें खान

* हा रामजी पुढें सूरीश्वरांपाशी दीक्षा घेतो

मोठ्या विचारात पडला. इकडे शहरात सूरीश्वर सुभेदाराकडे असल्याची बातमी पसरली. सुप्रसिद्ध शेठ कुवरजी यानीं सुभेदाराकडे जाऊन सूरीश्वर फकीर आहेत, गरिबाचे कैवारी आहेत, असें सागून सूरीश्वराच्या सज्जनतेबद्दल खानाची खात्री केली. निकालामध्यें सूरीश्वराना निर्दोषी ठरविण्यात आलें. पण सूरीश्वरावर रचलेल्या दुष्ट थट्टेचें नाटक तेथें सपलें नाहीं. आचार्य महाराजावरील एक मोठें सकट टळलें म्हणून अमदाबादच्या जैनानीं मोठ्या आनदानें व उत्साहानें दानधर्मास सुरवात केली दानधर्माच्या ठिकाणीं इनाम घेण्याच्या उद्देशानें एक तुर्की शिपाई येऊन थडकला. सुरीश्वराना कोणीं सोडविलें या मुद्यावर कुवरजींची व त्याची खडाजगी झाली. पण नाइलाज झाला म्हणून सूरीश्वर कसे अडकवले जात नाहींत हें पाहू अशी धमकी देऊन तो रागारागात निघून गेला. कोतवालापाशीं त्यानें सूरीश्वराबद्दल कुरकूर केली. खानानें कोतवालावर विश्वास ठेवला. आणि ह्याचा परिणाम सूरीश्वराना कैद करण्याचा हुकूम सोडण्यात झाला पाशवी सत्तेचे बाहुलें होऊन बसलेल्या शिपायानीं सूरीश्वराना पकडलें. पण सुदैवानें त्याची विटबना झाली नाहीं. राघवगधर्व व सोमसागर नावाच्या दोघा वीरानीं शिपायाचीं हाडें मोकळीं करून त्याना पिटाळून लावलें सूरीश्वरानीं लगेच तेथून विहार केला खानास ही हकीगत समजली. तो गुरगुरला. एक मली मोठी शिपायाची तुकडी सूरीश्वराना पकण्यासाठीं पाठविण्यात आली. ही बातमी हा हा म्हणता गावात पसरली घराच दरवाजे बद झाले. सूरीश्वराचा कसून तपास करण्यात आला. पण ते सापडले नाहींत. त्याच्याऐवजीं दोघा निरपराधी साधूना पकडण्यात आलें. बिचाऱ्याना फुकट त्रास सहन करावा लागला. तपासान्तीं ते निराळेच साधु आहेत असें कळल्यानतर त्याना सोडण्यात आलें अशा रीतीनें हें प्रकरण सपलें या प्रसगीं सूरीश्वराना पळून जाणें भाग पडलें.

सत्तेनें उन्मत्त झालेल्या सुभेदाराकडून आणखी दोन वेळा असाच त्रास देण्यात आला. अर्थात् या दोन्ही प्रसगाना दोन साधूच कारणीभूत झाले होते

[जगमाल नावाच्या एका साधूस धर्मग्रथ वाचण्यास न मिळाल्यामुळें त्यानें सूरीश्वराकडे तक्रार नेली. पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं.

नंतर त्यास सभाबाहेर टाकण्यात आलें. त्यामुळें जगमालनें चौरसदच्या हकिमाकडे फिर्याद नेली सूरीश्वराना चौरसद सोडणें भाग पडलें. त्याच्या पाठीमागें घोडेस्वार आले. पण जैन श्रावकांनी त्या घोडेस्वाराची समजूत घालून त्याना मागें फिरविलें. स. १६३४ मध्यें सूरींनीं पाटणचे जवळ असलेल्या कुणगेर येथें सोमसुंदर नावाच्या आचार्यांस वदन करण्याचें नाकबूल केल्यामुळें त्यानें ईर्षेनें पाटणच्या सुभेदाराचें सूरीश्वराविरुद्ध मन वळविलें सूरीश्वरांनीं रातोरात वडावली येथें प्रयाण केलें. तेथें एका घराच्या भुयारात कांहीं वेळ काढल्यानंतर तीन महिने त्याना गुप्तपणें राहावें लागलें.]

या प्रत्येक प्रसंगातून सुटण्याची सूरीश्वरांनीं शिकस्त केली आहे. संकटा मागून संकटें येताना सूरीश्वरांनीं समयसूचकता राखली नसती तर कदाचित् त्याना अकबराच्या कारागृहवासात एक गुन्हेगार कैदी म्हणून रितसर पडावें लागलें असतें. लहरी आणि जुलमी अधिकाऱ्याकडून त्याना न्याय मिळण्याची आशा नव्हती सूरीश्वर भ्याले असा जर कोणी त्यांच्यावर आरोप ठेवील तर त्या थोर पुरुषांची किंमत कमी करण्यासारखें आहे. असा त्यांनीं काय गुन्हा केला होता कीं त्यांनीं क्रूर कायद्याच्या कचाटींत सापडावें ? पुन्हा त्यांची कारागृहकैद ही लहानसहान गोष्ट नव्हती. सबंद जैनसमाजाच्या इभ्रतीचा तो प्रश्न होता. आणि म्हणूनच कित्येक श्रावक त्यांच्या मदतीला धावून आले.

इकडे सूरीश्वराना सुभेदारापासून उपद्रव होत असताना स्वतः बादशहा अकबर सूरीश्वराना पहाण्यास उत्सुक झाला होता.

४

चंपा अकबरास म्हणते— 'ज्यांचें ध्यान करून आम्हास सिद्धि मिळते असे आमचे देव आहेत, तसेंच आमचे गुरु सुसाधूमध्यें श्रेष्ठ असे हीर विजयसूरि आहेत.'

दुपारचा समय होता. बादशहा अकबर आपल्या महालाच्या झरोक्यांत बसला होता त्या समयीं राजमार्गावरून एक मोठी मिरवणूक वाजत गाजत चालली होती. मिरवणुकीच्या मध्यमागीं एक पालखी दिसत होती. परिचारक चवऱ्या ढाळीत होते. मधून मधून 'जिन शासन की जय' असा

जयघोष ऐकू येत होता. वाजंत्रींच्या मधुर आवाजाकडे अकबराचें लक्ष वेधलें गेलें. तेव्हा त्यानें आपल्या एकनिष्ठ सेवकाकडे पाहून म्हटलें, 'टोडरमल्ल, आज ही शहरात काय धामधूम आहे?'

'जहापनाह, जैन लोकाची ही मिरवणूक आहे. चपा नावाच्या एका श्राविकेनें सहा महिन्याचा केलेला उपवास आज समाप्त होत आहे. आणि म्हणून चपाच्या सन्मानार्थ ही मिरवणूक काढली आहे.'

'सहा महिन्याचा उपवास? काय म्हणता टोडरमल्ल? हें दिव्य साहस करणारी स्त्री या मिरवणुकीत असेल तर तिला राजवाड्यामध्यें आणण्याची व्यवस्था तावडतोब करा.'

बादशहाचा हुकूम! मिरवणूक तात्काळ थाबविण्यात आली पालखीला राजवाड्याच्या प्रवेशद्वारानजीक नेण्यात आलें. पाढरें वस्त्र परिधान केलेली व कडक उपवासामुळें कृश झालेली चपा पालखींतून हळूच खाली उतरली. दिवाणखान्यात प्रवेश केल्याबरोबर बादशहानें तिचें स्वागत केलें आणि आपल्या समोरच्या आसनावर बसण्यास सागून तो म्हणाला, 'चपाबाई, आपण किती दिवसाचा उपवास केला?'

'खाविंद! मीं सहा महिने अन्नग्रहण केलें नाहीं. गरम करून थड केलेलें पाणी मात्र केव्हा केव्हा दिवसा घेत असें. अशा रीतीनें केलेला उपवास आज मीं सोडला आहे.'

'अशी उग्र तपचर्या कोणत्या दिव्य शक्तीच्या आधारें तू करू शकलीस?''

'माझ्या उपवासाच्या पाठीमागें परम तीर्थंकर ऋषभदेव यांवरील अढळ श्रद्धा आणि गुरु हीरविजयसूरि याचा शुभाशीर्वाद होता.'

'हीरविजयसूरींचा मुकाम हल्लीं कोठें आहे?'

'त्याचा मुकाम हल्लीं गुजरातमधील गधार बदरामध्यें आहे.'

विचारात मग्न झालेल्या बादशहानें सोन्याच्या बागड्या चंपास अर्पण केल्यानतर मिरवणूक पुन्हा सुरू झाली. चपा गेली पण चपामुळें निर्माण झालेले विचारतरग मात्र बादशहाच्या मनातून कमी होईनात. दिवसा उपवास करून रात्रीं अन्नसेवन करण्याच्या उपवासाची पद्धत जाणणाऱ्या अकबराला सहा महिन्याचा उपवास हें एक मोठें गूढ वाटलें. हीरविजयसूरींबद्दल त्याला अत्यत जिव्हाळा वाटू लागून त्याचें दर्शन घेण्यास तो अत्यत उत्सुक

झाला. नामांकित धर्मपंडितांकडून त्यानें निरनिराळे धर्मरहस्य जाणून घेण्याचा प्रयत्न केला होता. व निरनिराळ्या विद्वानांना आपल्या दरबारीं ठेवून त्यांचा मानसन्मानही केला होता. पण अशा अशाप्य मताची त्यास कोणी माहिती करून दिली नव्हती. सूरीश्वराची कीर्ति मात्र त्यानें ऐकली होती. धर्मसभेमध्यें शास्त्रचर्चा करीत असताना, 'माझ्या राज्यांत सर्व दर्शनांमध्यें असा कोणी महात्मा आहे कीं जो सदैव निष्पाप मार्गाची आराधना करीत असतो?' अशा त्याच्या प्रश्नाला उत्तर देताना एका सभासदानें हीरविजयसूरींचें नाव सुचविलें होतें. पुन्हा चंपाकडून हीरविजयसूरींची स्तुति ऐकली तेव्हां मात्र त्यास धीर निघेना. गुजरातशीं परिचित असलेल्या इतिमादखानास आणि आपल्या दरबारीं असलेल्या थानसिंह* व मानुकल्याण या श्रावकांना त्यानें तातडीनें भेटीस बोलाविलें.

'इतिमादखान, गुजरातमध्यें हीरविजयसूरि नांवाचे कोणी जैन साधु आहेत का?'

'आलमपनाह, त्या महात्म्याची थोरवी मी कोणत्या शब्दांनीं वर्णन करूं? ते एक सच्चे फकीर आहेत. गाडी, घोडा, एका इत्यादि वाहनाचा सुद्धा उपयोग करीत नाहींत. कंचन-कामिनीचे ते त्यागी आहेतच. अहोरात्र ईश्वराची सेवा करून लोकांना उपदेश देण्यात ते कालव्यय करतात.'

इतिमादखानाच्या भाषणानें बादशहा अधिक उत्कंठित झाला. इतक्यात थानसिंह व मानुकल्याण येऊन पोहोंचले.

'थानसिंह, जैन धर्माचीं मुख्य तत्त्वें काय आहेत हें तूं सांगूं शकशील काय?' बादशहानें त्याच्याकडे दृष्टि रोखून विचारलें.

'धर्माचीं तत्त्वें यःकश्चित् असा मी काय सांगूं शकणार? एखादा धर्मगुरु त्याचें चांगलें विवेचन करील. मात्र आमच्या धर्मासंबंधीं थोडक्यात सांगावयाचें झाल्यास 'अहिंसा परमो धर्मः' अर्थात् अहिंसा हाच खरा धर्म असें आम्ही मानतों.

* थानसिंह हा सूरीश्वरांचा शिष्य. यानें फत्तेपूरमध्यें मोठ्या उत्साहानें जिनबिंबाची प्रतिष्ठा सूरीश्वरांच्या हातून करवली होती त्याच वेळीं शांतिचंद्रजींना उपाध्यायपद देण्यात आलें. या थानसिंहानें आग्र्यास चिंतामणि पार्श्वनाथाचें मंदिर बांधलें आहे.

'बरें, माझ्या डोक्यात एक नवीन कल्पना आली आहे. हीरविजयसूरींना भेटण्यासाठीं माझें मन फार उत्सुक झालें आहे. गुजरातच्या सुमेदारास ह्याबद्दल मी पत्र लिहितों आणि आपण हीरविजयसूरींना येथें येण्याबद्दल एक विनतिपत्र लिहा.'

नंतर बादशहाचें पत्र घेऊन मौदी आणि कमाल नावाचे दोन दरबारी साडणीस्वार गुजरातकडे रवाना झाले. हत्ती, घोडे, पाल्खी याच्यासह मोठ्या थाटामाटात हीरविजयसूरींना पाठवा असा बादशहाचा हुकूम वाचल्याबरोबर शिहाबखान आश्चर्यचकित झाला. पाऊस न पाडण्या-संबंधीं सूरीश्वराना जो त्रास त्यानें दिला होता त्याबद्दल त्यास लाज वाटूं लागली. ज्या फकिरास आपण पकडण्याची शिकस्त केली त्याच्यावर खुद्द बादशहाची इतकी मर्जी बसली हें पाहून त्यास नवल वाटलें. शेवटीं गत न शोच्य या न्यायानें मागील प्रकरण विसरून जाऊन बादशहाचें फर्मान तडीस नेण्यासाठीं त्यानें अमदाबादच्या जैन नागरिकाना एकत्र केलें. बादशहाचा हुकूम वाचून दाखविल्यानंतर त्यानें एक भाषण केलें. त्यात त्यानें सागितलें कीं, बादशहा स्वतः आमंत्रण देत आहे. तेव्हा आपण हीरविजयसूरींना जरूर फत्तेपूरशिक्रीस पाठवा. प्रवासामध्यें त्याना काहीं अडचण पडणार नाहीं याची खात्री असू द्या.

खानाच्या सरळ भाषणानें जैन पुढान्याना भीति वाटली. त्यानी खानास सागितलें कीं सूरीश्वर सध्या गधार बदरामध्यें आहेत. आम्ही त्याना भेटूं आणि बादशहास भेटण्याची विनति करूं.

## ५

खंबायत शहराजवळ आज जेथें काहीं पुरातन अवशेष आणि अरण्य आहे तेथें पूर्वीं गंधार नावाचें सुंदर बेट होतें. सूरीश्वराना भेटण्याची जेव्हा बादशहास इच्छा झाली त्या वेळीं त्याचा मुक्काम या बेटामध्येंच होता. तेथें दररोज सकाळीं धार्मिक विषयावर ते प्रवचन करीत. त्याची मधुर वाणी व अगाध ज्ञान यामुळें कित्येक स्त्रीपुरुष मुग्ध होऊन जात. गुजरातच्या सुमेदारास कबूल केल्याप्रमाणें सूरीश्वराना भेटण्यासाठीं अमदाबादचें एक महाजनमंडळ एके दिवशीं सकाळीं गधार बदरीं येऊन पोहोंचलें. देवपूजा केल्यानंतर

सूरीश्वराना वंदन करण्यासाठी ते उपाश्रयात गेले. उपाश्रय त्या वेळीं स्त्री-पुरुषांनीं गच्च भरलें होतें. श्रोतृवर्ग आचार्यांचें प्रवचन ऐकण्यात इतका गुंग होऊन गेला होता कीं पाहुण्याचें आगमन झालेलें त्यास कळूनसुद्धा आलें नाहीं. सूरीश्वरांनीं मान त्यास वंदन करताना पाहिलें होतें. व्याख्यान संपलें. अमदाबादच्या मंडळींकडे पाहताच सर्वत्रीनें त्यांचें स्वागत केलें. नंतर सर्व मंडळी आचार्य महाराजांकडे गेली. अमदाबादच्या नगरशेटनें सूरीश्वराना भेटण्याची बादशहाची इच्छा आणि गुजरातच्या सुभेदारास आलेला हुकूम वगैरे माहिती सूरीश्वराना करून दिली.

जमलेल्या मंडळींत निरनिराळे तर्कवितर्क सुरू झाले. उलटसुलट विचार मांडण्यांत येऊ लागले. एक गृहस्थ उठला व म्हणाला, 'बंधूनो, सूरीश्वराना सम्राट्कडून भेटीचें आमंत्रण आलें आहे हें खरें पण आचार्यश्रींनीं स्वतः जावें हें योग्य दिसत नाहीं. बादशहास धर्म ऐकण्याची गरज असेल तर तो स्वतः सूरीश्वराकडे येईल.'

त्याचें भाषण संपण्याचे अगोदरच 'बरोबर बरोबर' असें एकजण पुटपुटला.

काहींचें म्हणणें पडलें कीं बादशहा म्लेच्छ आहे, दुष्ट आहे, म्हणून सूरीश्वरानीं न गेलेलें बरें आणि येथें सुद्धा न राहता दीव बेटात गुप्तपणें राहावें. अनेक स्त्रियांच्या गराड्यात सापडलेल्या बादशहास सूरीश्वराशीं धर्मचर्चा करण्यास सवड सांपडणार नाहीं म्हणून आचार्यश्रींनीं जाण्याचें टाळावें असें एक जणानें आपलें मत ठोकलें ! पण एक समंजस श्रावक म्हणाला, 'आपण आपले विचार मांडीत आहात पण आचार्यश्रींचें या बाबतींत काय म्हणणें पडतें हें पाहाणें योग्य होईल.'

सर्वांचें म्हणणें शांतपणानें ऐकून घेतल्यानंतर सूरीश्वर म्हणाले, 'देवानुप्रिय हो, आपण जर जैन साधूंची परंपरा पाहाल तर आपणास आढळून येईल कीं जैनशासनाच्या सेवेसाठीं मानापमान सहन करून त्यानीं अनेक राजाना सन्मार्गी दाखविलं आहे. आर्य महागिरीनें राजा संप्रतीला, बप्पभट्टसूरींनीं आमराजाला, सिद्धसेन दिवाकरानीं विक्रमादित्याला व कलिकालसर्वज्ञ हेमचंद्राचार्यांनीं राजा कुमारपालास उपदेश केला आहे. या थोर साधूंचा किंवा गिरविर्ण मार्ग कर्तव्य आहे. महावीर स्वामींच्या सिद्धान्ताचा

घरोघरी प्रचार झाला पाहिजे अशी माझी इच्छा आहे. 'सवि जीव करूं शासनरसी' या भावनेचा मूळ उद्देश समजला पाहिजे. खुद्द बादशहानें आमंत्रण दिलें आहे तेव्हां मानापमानाचा प्रश्न उद्भवत नाहीं. हजारों लोकांना उपदेश करण्यानें जें कार्य होतें तें एकट्या राजास उपदेश करून होण्यासारखें आहे. पुन्हा अकबर अविचारी, स्वच्छंदी आणि दुष्ट आहे असें मला वाटत नाहीं. तो मोठा धर्मजिज्ञासू आहे असें मी ऐकतों. त्यास जैन तत्त्वज्ञानाची ओळख करून देऊन त्याच्यामार्फत कांहीं लोकोपयोगी धार्मिक कार्ये करवून घ्यावीं अशी माझी उत्कट इच्छा आहे. तिकडे विहार करण्याचें ठरलें म्हणजे बऱ्याच धर्मतीर्थांचें दर्शन मला आपोआप घडेल.'

सूरीश्वराच्या व्याख्यानानें यक्षिणीच्या कांडीप्रमाणें चमत्कार घडवून आणला. सूरीश्वर-सम्राट्भेटीबद्दल आता मंडळी उत्सुक झाली. सर्वांची संमति मिळताच सूरीश्वरांनीं अमदाबादकडे विहार करण्याचें ठरविलें. *सूरीश्वरांनीं जेव्हां गंधार बंदर सोडलें त्या वेळचा प्रसंग फार गंभीर होता.* श्रावक-श्राविकांच्या डोळ्यांतून सूरीश्वराच्या विहारामुळे अश्रु वाहूं लागले. अमदाबादमध्यें सूरीश्वराचें भव्य स्वागत करण्यांत आलें. या स्वागत-समारंभात खुद्द सुभेदारानें भाग घेतला होता. त्यानें मागील प्रसंगाबद्दल सूरिजींची माफी मागितली व बादशहा अकबराकडे जाण्याची विनंति केली. नंतर हिरे, माणिक इत्यादि वस्तु बादशहाचे आज्ञेप्रमाणें नजराणा म्हणून पुढें ठेविल्या व हत्ती, घोडा, गाडी, पालखी इत्यादिकांचा प्रवासा-*साठीं उपयोग करण्याबद्दल विनंति केली. सूरीश्वरांनीं नजराणा आणि हीं* प्रवासाचीं साधनें यांचा अव्हेर केला व बादशहाचे भेटीसाठीं ते नेहमींप्रमाणें पायीं निघाले.

अमदाबाद ते उसमानपूर, सोहला, हाजीपूर, बोरीसाणा, कडी, वीस-नगर, मेहसाणा वगैरे गावांवरून ते पाटणाला आले. पाटणहून वडली येथें गेले. तेथें त्यांनीं आपले गुरु विजयदानसूरि यांच्या स्तूपास (पादुकांस) वंदन केलें. वडली सिद्धपूरहून ते पुढें आबू पर्वतावर यात्रेस आले. आबूहून *सिरोहीला आले.* सिरोहीचा सुरत्राण यानें सूरिजींचा सत्कार केला व मदिरापान, शिकार, मांसाहार व परस्त्रीसेवन या गोष्टी न करण्याची प्रतिज्ञा केली. तेथून ते सादडीवरून राणकपूरला यात्रेस गेले. तेथून ते मेडतें येथें

आले. मेडत्याचा सुल्तान साहीम यानें त्याचा आदरसत्कार केला. मेडत्याहून फलोधी येथें ते यात्रेस गेले. व तेथून परत मेडत्यास येऊन सागानेरहून फत्तेपुरशिक्रीस आले.

गुजरात, जोधपूर व जयपूर राज्यातून प्रवास करीत असताना त्यांनी ठिकठिकाणीं उपदेशामृत पाजलें व आबू, राणकपूर व फलोधी या तीन यात्रा केल्या

ते सागानेर येथें असताना त्याचे शिष्य विमलहर्ष उपाध्याय, सिंहविमलन्यास, धर्मसीऋषी व गुणसागर यांनीं पुढें जाऊन अगोदर बादशहाची मुलाखत अबुल्फजल्च्या मध्यस्थीनें घेतली. भेट घेण्याचा उद्देश बादशहाच्या स्वभावाचें निरीक्षण करण्याचा होता.

या भेटीमध्यें विमलहर्ष उपाध्यायानीं बादशहावर उत्तम प्रभाव पाडला. अकबरास वाटलें ज्याचा शिष्य इतका विद्वान् आहे तो स्वत: किती विद्वान् साधुश्रेष्ठ असेल !

## ६

कित्येक दिवसापासून चातकासारखी वाट पहात बसलेल्या फत्तेपुरशिक्रीमधील जैन श्रावक श्राविकाना हरिविजयसूरींचें आगमन हा मोठा हर्षाचा व समाधानाचा विषय होऊन बसला होता. फत्तेपूरशिक्रीमध्यें सूरीश्वराना वाजत गाजत तेथील श्रावक मंडळी आणीत असताना सूरीश्वराच्या मुखावर देखील समाधानाच्या छटा दिसू लागल्या. कारण गधारपासून शिक्रीपर्यंतचा लांब्च्या टापूचा प्रवास दीड वर्षानें सूरीश्वर आणि त्यांच्या शिष्यानीं सुखरूपपणें संपविला होता. साधुमार्गे कित्येक श्रावकाच्या मनात सूरीश्वर सम्राट्भेटीबद्दल किंचित् भीतियुक्त उत्कंठा वसत होती. कारण असें कीं सूरीश्वराच्या चार उपदेशाच्या गोष्टी जर बादशहास रुचल्या तर त्यायोगें जैन धर्माचा केशरी झेंडा मानानें साम्राज्यात फडकत राहील. आणि हें रम्य दृश्य पहाण्यास सर्व उत्कंठित झाले होते. पण त्याबरोबरच थोडी भीतीही त्याच्या मनास शिवत होती. कारण अकबराकडून सूरीश्वरांचा मानमरातब ठेवण्यात आला नाहीं तर तो अखिल जैनसमाजाचा अपमान होईल असें त्यांना वाटत होतें. पण अशुभ घडण्याचा समय कभी होता. अकबर



बादशहानें सूरीश्वराना सामोरें जाऊन त्याचें स्वागत केलें. (पृ.४५)

[देवचंद लालभाई पुस्तक भांडार, सुरत, यांचे कृपेनें

सूरीश्वराच्या पहिल्या भेटींतच आकर्षिला गेला.

तो संवत् १६३९ ज्येष्ठ वद्य १३ चा शुभ दिवस होता आणि सूरीश्वर धरून एकूण तेरा साधु होते. त्याच्यापैकीं कोणी सिद्धान्तशिरोमणि, कोणी शतावधानी, कोणी कवि, कोणी पंडित होते. श्वेतवस्त्र परिधान करून जमिनीवर नजर टाकीत ते राजवाड्याकडे जात होते त्यांच्या तोंडावर अहिंसा, संयम-व तपाचें चंद्रासारखें शांत तेज चमकत होतें. राजवाड्याजवळ ते येताच बादशहाचें लक्ष त्यांच्याकडे गेलें. तो तात्काळ उठला. त्याच्या मागोमाग बादशहाचे सेलीमादि पुत्र आणि थानसिंह वगैरे दरबारी मंडळी राजवाड्याबाहेर आली नंतर बादशहानें सूरीश्वराच्या सामोरें जाऊन त्यांचें स्वागत केलें राजवाड्याच्या आवारांत ही सर्व मंडळी उभी असतां सूरीश्वर सम्राटामध्यें खालील भाषण झालें:—

अकबर — माझ्यासारख्या परधर्मीय मनुष्यावर उपकार करण्याच्या हेतूनें जे आपण श्रम घेतले त्याबद्दल मी आपली माफी मागतों.

सूरीश्वर— राजन्, कसली क्षमा मागतां ? धर्माचा उपदेश करणें हें आमचें कर्तव्य आहे. तें करीत असतांना आम्हास ठिकठिकाणीं हिंडावें लागतें. आणि प्रवासांत थोडा त्रास हा होणारच.

अकबर— आपण इतक्या लांबचा प्रवास कां पायीं केला ? काय माझ्या गुजरातच्या सुभेदारानें आपणाकरितां गाडी, घोडे, पालखी वगैरेंची व्यवस्था केली नाहीं ?

सूरीश्वर— राजन्, आपल्या सुभेदारानें तशी सर्व व्यवस्था केली होती. पण आम्हीं सर्व प्रवास पायींच केला पाहिजे अशी आम्हास शास्त्राज्ञा आहे. ज्या दिवशीं आम्हीं फकिरी पत्करली त्या दिवसापासून आम्ही कोणत्याही गोष्टीचा संग्रह करीत नाहीं आणि कोणतेंही वाहन वापरीत नाहीं.

हें ऐकून अकबरास किंचित् आश्चर्य वाटलें. पण थानसिंहाकडे दृष्टिक्षेप करून तो म्हणाला, 'थानसिंह, मला जर ह्या साधुजीवनाची पूर्वीच कल्पना असती तर मी सुरीश्वरांना भेटीचें आमंत्रणच धाडलें नसतें. पण कां रे, तू तर मला सांगायचें ना ?'

थानसिंहानें बादशहाकडे पाहिलें. बादशहास काय उत्तर द्यावें या विचारांत तो होता. इतक्यांत अकबर म्हणाला, 'ठीक आहे. समजला

तुझा बाबा. तुझा मतलब साधण्यासाठी तू मला अज्ञानात ठेवलेंस अं ? सूरीश्वराचें ह्या मार्गामध्यें कधीं आगमन झालें नव्हतें तेव्हां त्यांच्या दर्शनासाठीं तू मला विरोध केला नाहींस कितीं झालें तरी तू बनिया ना !'

बादशहाच्या ह्या विनोदानें मुनिमंडळ व इतर मंडळी खुष झाली.

नंतर सुरीश्वराकडे दृष्टिक्षेप करून बादशहा म्हणाला, 'आपण सध्या कोठें वास्तव्य केलें आहे ?

'आम्ही सर्वजण जगन्माल कच्छवाहाच्या महालामध्यें तूर्त शहरांत आहोंत ' सूरीश्वरांनी उत्तर दिलें.

वेळ बराच झाल्यामुळें आणि सूरीश्वराना जास्त वेळ गोळवून ठेवू नये म्हणून बादशहा थानसिंहास म्हणाला, 'थानसिंहा, आचार्य महाराजांची राहण्याची व्यवस्था शहरांत प्रशस्त ठिकाणीं करा आणि उद्यां त्यांना मोठ्या थाटामाटांत चित्रशाळेंत घेऊन या. तेथें उद्यां सूरीश्वरांचें प्रवचन व्हावें अशी माझी इच्छा आहे.'

पण स्वत.ची खास व्यवस्था व्हावी असें सूरीश्वराना वाटत नव्हतें. पुन्हां फत्तेपूरशिक्रींत उपाश्रय असल्यामुळें आपण दुसरीकडे राहू शकत नाहीं असें मोठ्या प्रेमळ शब्दांत बादशहास सांगितल्यानंतर त्यांनी स्वस्थळीं प्रयाण केलें.

७

'राजन्, ह्या गालीच्यावर पाय ठेवून आम्हास चित्रशाळेंत प्रवेश करतां येत नाहीं.' सूरीश्वराचे निश्चयाचे बोल ऐकून बादशहा किंचित् विचारांत पडला. पण प्रसंगाची कल्पना करून तो म्हणाला, 'आपण दिवाणखान्यांत प्रवेश करण्याचें का टाळीत आहांत ? गालीचा स्वच्छ आहे आणि त्यावर कांहीं जीवजंतु असल्याचें देखील दिसत नाहीं. तेव्हां त्यावरून जाण्यांत हरकत ती कोणती ?'

गंभीर मुद्रा करून सूरीश्वर म्हणाले, 'आम्हा जैनांना सर्व प्राणी सारखे आहेत. बुद्धिवान् असे जे मानव त्यांना जितका ह्या जगांत राहण्याचा अधिकार आहे तितकाच जीवजंतूनाहि आहे. आणि म्हणून आमच्या हातून मुंग्या, किडे इत्यादि बारीक प्राण्यांचा घात होऊ नये यांबद्दल दक्षय

ची काळजी आम्ही घेतों. आपण म्हणता त्याप्रमाणें गालिचावर जीवजंतु नसतील पण हे बारीक जीव गालिच्यासाठीं वावरत नसतील हें कशावरून ? आणि मी जें हें मागत आहे तें फक्त आम्हा जैनानाच लागू आहे असें नाहीं. मनुस्मृतीमध्यें म्हटलें आहे—दृष्टिपूतं न्यसेत् पाद वस्त्रपूतं पिबेज्जलम् । सत्यपूतं वदेद्वाक्यं मनःपूतं समाचरेत्* ॥

कोणत्याही विज्ञानशास्त्रामध्यें एखादा नवीन शोध लागला म्हणजे जसें आश्चर्य वाटतें तसें अहिंसेसंबधीं इतका खोल विचार केलेला पाहून अकबराला नवल वाटलें. त्यानें नोकराना गालीचा दूर करण्याबद्दल नेत्रसंकेत केला. तात्काळ मुग्याची रांग बादशहास जमिनीवर दिसली. तो चकित झाला. बारीक वस्त्रानें मुग्याना दूर केल्यानंतर सूरीश्वरानीं चित्रशाळेंत प्रवेश केला. ह्या एकाच प्रसंगानें बादशहाची सूरीश्वरावर श्रद्धा बसली.

ज्याच्या साम्राज्यानें भारतातील अर्ध्या भागापेक्षा अधिक प्रदेश व्याप्त केला आहे त्याच्या चित्रशाळेचें जितकें वर्णन करावें तितकें थोडें आहे. आज सूरीश्वराचें प्रवचन होणार म्हणून ती चित्रशाळा सजविण्यांत आली होती. सूरीश्वरासाठीं एक व्यासपीठ आणि त्यांच्या शिष्यवर्गासाठीं एका भव्य बैठकीची व्यवस्था करण्यांत आली होती. ह्या चित्रशाळेमध्यें प्रवेश केल्यानंतर सूरीश्वर, बादशहा आणि इतर मंडळी आपापल्या जागीं विराजमान झाली.

आपल्या प्रास्ताविक भाषणात बादशहा म्हणाला, 'माझ्या प्रजेचे मी दोन विभाग करतों—एक हिंदु प्रजा आणि दुसरी मुसलमान प्रजा. या दोन्ही प्रजाना मी माझ्या दोन नेत्राप्रमाणें मानतों. दोन्ही प्रजा आनंदात, सुखासमाधानात राहाव्या अशी माझी उत्कट इच्छा आहे. मी जरी जन्मानें मुसलमान असलों तरी माझी प्रवृत्ति प्रजेमध्यें भेदभाव करण्याची नाहीं. माझी धर्मावर श्रद्धा आहे. निरनिराळया धर्मगुरूंचीं प्रवचनें ऐकण्याची मला आवड आहे. पूज्य सूरीश्वराचें स्तुतिगान मीं दीड वर्षापूर्वी ऐकलें होतें. नंतर मी त्याना येथें येण्याचें आमंत्रण दिलें. त्यानीं तें स्वीकारलें. आणि अनेक कष्ट सहन करून ते गुजरातहून येथें पायीं

*दृष्टीनें पवित्र झालेल्या जमिनावर पाय ठेवा, वस्त्रानें गाळून पाणी प्या. सत्य वचन करा आणि पवित्र आचरण ठेवा.

८

श्रीकृष्ण आणि श्रीनेमीनाथ हे दोन बंधु होते. एक कर्मवीर तर दुसरे धर्मवीर. हिंदूंना जसे श्रीकृष्ण तसे जैनाना श्रीनेमीनाथ. श्रीनेमीनाथ आणि राजिमती ही जोडी अजरामर झालेली आहे. शौरीपूर हें श्रीनेमीनाथाचें जन्मस्थान. आग्र्याच्या चातुर्मासानंतर सूरीश्वर शौरीपुरास गेले. ह्या पवित्र भूमीमध्यें प्रवेश करताना सूरीश्वराना अत्यानंद झाला. त्या नगरात असताना श्रीनेमिनाथाचा हजारो वर्षांपूर्वीचा इतिहास सूरीश्वराच्या डोळ्यापुढें ताजा झाला. ते शौरीपुरास आणि आग्र्यास निरानिराळ्या मंदिराची प्रतिष्ठा करण्यात गुग झाले.

पण इकडे सूरीश्वराशिवाय अब्बुल फजलला चैन पडेना. सूरीश्वर समाट्-भेटीच्या अगोदर फजल आणि सूरीश्वर याची ओळख झाली होती. आणि या ओळखीचें मैत्रींत रूपान्तर झालें होतें. फजल मंत्री होता. सूरीश्वर साधु होते. पण दोन्ही विद्वान् होते. आणि म्हणूनच त्याची मैत्री शेवट-पर्यंत टिकली.

अब्बुल फजलच्या आमन्त्रणामुळे सूरीश्वर जेव्हां परत फत्तेपूरशिक्रीस आले तेव्हा फजल त्याना आपल्या निवासस्थानीं घेऊन गेला.

योगायोग असा कीं ह्याच वेळीं बादशहा फजलकडे आला होता. सूरीश्वराना तेथें पाहिल्यानें तो फार खूष झाला पण सूरीश्वर केव्हां फत्तेपूर-शिक्रीस परत आले हें त्यास माहीत नसल्यामुळें तो अब्बुल फजलला म्हणाला, 'फजल, सूरीश्वराचा मुक्काम येथें असताना आपण मला तरी कां कळविलें नाहीं ?'

'जहापनाह, सूरीश्वराचें आजच आग्र्याहून आगमन झालें आहे. आणि ही खबर मी स्वतः आपणास कळविणार होतों पण त्यांच्याशीं झालेल्या वादविवादात वेळ केव्हा निघून गेला हें कळलें सुद्धा नाहीं. त्याबद्दल मला दुःख होतें.'

'तुला दुःखी होण्याचें कारण काय ? सूरीश्वराचें प्रवचन ऐकावें, त्यांच्याबरोबर काहीं धर्मचर्चा करावी असें मला नेहमी वाटतें. आणि ते देखील मोठ्या उदार मनानें माझ्या मनाची ही भूक शमवीत असतात. त्याचें ऋण मी केव्हा फेडीन असें मला होऊन गेलें आहे. कित्येक दिवसां-

पाहून मला वाटतें कीं अश्व, हत्ती आणि काहीं जडजवाहीर देऊन त्याचा सन्मान करावा. पण तें शक्य होईल का?'

बादशहाचे विचार ऐकून सूरीश्वर गंदिवल्लभ म्हणाले, 'राजन्, हा सन्मान आम्हांस कशाला हवा? या गोष्टींचा गमद हा मोठ्या सरदाराचा आणि राज्याधारांच्या बादशहाचा अलंकार आहे. आमची गोष्ट निराळी आहे. शास्त्रानीं सर्वी धातूंनेही आम्हांस वापरण्याची मनाई आहे. शास्त्राचें जेवण झाल्यानंतर राहिलेल्या स्वयपाकावर आम्ही आमची उपजीविका करतो. त्यांनीं टाकून दिलेलीं वस्त्रें आम्ही परिधान करतों. स्नान, शृंगार आदि क्रिया आम्हांस निरर्थक वाटतात. तेव्हां आपण सांगत असलेल्या वस्तूंचा स्वीकार करून मायाजाळामध्यें सापडण्याची गोष्ट कशाला? या मायाजाळामध्यें जे सांपडले आहेत त्यांना जागृत करण्याची कामगिरी आमच्यावर आहे. आम्हांस हिंसा, असत्य भाषण, चौर्य, मैथुन आणि संग्रह यांपासून अलिप्त राहावयाचें आहे. आणि अगदीं सूक्ष्म जीवांनाही आमच्याकडून उपद्रव होणार नाहीं असें वागावयाचें आहे.'

'सूरीश्वर, मनुष्यावर प्रेम करावें हें मला पटतें पण आपण मानवांनीं हरीण, ससे, बकऱ्या इत्यादि क्षुद्र जीवांबद्दल का पर्वा करावी हें मला समजत नाहीं. हे सर्व जीव मानवाच्या सुखाकरितां ईश्वरानें निर्माण केले आहेत असें नाहीं आपणास वाटत?'

'राजन्, या जगामध्यें एक काळ असा होता कीं मनुष्य नरमांसभक्षण करीत होता. आता त्याला सकल प्राणिमात्र मानवसुखासाठीं निर्माण झाले आहेत असें वाटतें. ज्या हरिणाची केवळ हौसेखातर आपण शिकार करता त्यास स्वतःचा जीव प्यारा नाहीं का? मनुष्यावर जरी कट्यार चालविली असता तो घायाळ होतो तद्वत् पारध्याच्या बाणापासून त्याचा जीव कासावीस होत नसेल का? आणि म्हणून स्वतःचा प्राण वाचविण्यासाठीं तो इकडे तिकडे सैरावैरा पळत नाहीं का? मानवांच्या सुखासाठीं बकऱ्याच्या मानेवर कसायाकडून सुरी फिरवण्यात येते त्या वेळीं जीवें जें असा आवाज निघतो त्याचा अर्थ काय? ज्या बुद्धीची मनुष्य शेखी [illegible] त्यास हा अर्थ समजू नये का? या जनावरांची मूक वाणी मान[illegible]नें ऐकली नाहीं हें दुर्दैव होय. आमच्यात हरीण, बकरी, ससा इत्यादि

प्राण्याचाच काय पण झाड, वनस्पति यांच्याही जीवनाचा विचार केलेला आहे. या सर्व जीवांना आपल्या प्रेमळ छत्राखालीं नांदवून आमच्या पैगंबरांनीं– तीर्थंकरांनीं– आम्हास आज्ञा केली आहे– सव्वे वि इच्छन्ति जीविऊं न मरिज्जिऊं। तुम्हा पाग वह घोर निगन्था वज्जयन्तिग।"*

'आचार्यमहाराज, आपल्या उपदेशानें माझा बुद्धिपालट झाला आहे. अधःकारात खितपत पडणाऱ्या अशा मला आपण जो प्रकाश दाखविला त्याबद्दल मी आपला ऋणी आहें. या माझ्या हातून कित्येक निरपराधी जीवांची हिंसा झाली असेल. मांसाहार केल्यामुळें कित्येक जीवांचीं कबरस्थानें माझ्या पोटात सापडतील. या सर्वांचा जबाब अल्लाच्या दरबारामध्यें मी कसा देऊं?'

'राजन्, आपणास झालेला पश्चात्ताप हा आपण केलेल्या अपराधांचें प्रायश्चित्त आहे. अजून आपण आपल्या सवयी बदलूं शकता. विलासांना योग्य वळण लावूं शकता. शेकडों प्राण्यांना जीवदान देऊन आपण आपल्या चुकांचें परिमार्जन करूं शकता. आग्र्याहून मीं पाठविलेल्या संदेशास मान देऊन आपण पर्युषणपर्वाच्या सप्तात† बारा दिवस जीवहिंसा बंद करण्याचा हुकूम दिला होता. त्यामुळें शेकडों प्राण्यांचे जीव वाचले असतील. अशा रीतीनें तुमच्या एका आज्ञेत लाखों जीवांचें रक्षण करण्याचें बळ आहे. डाबर तलावात§ जी हिंसा होते तिचा आपण एका क्षणात प्रतिबंध करूं शकता.'

'अब्दुल फजल, सूरीश्वरांच्या या उपदेशामुळें माझें पाप धुऊन काढण्याचें मीं ठरविलें आहे. ह्या दयाळू फकीराचा उपकार मी ह्याच रीतीनें फेडूं शकेन. डाबर तलावात होत असलेली हिंसा आणि माझ्या सबंद राज्यात पर्युषणपर्वाच्या वेळेस बारा दिवस जीवहिंसा होणार नाहीं अशीं फर्मानें आता काढण्याचा माझा विचार आहे. माझ्या प्रजेजवळ धनधान्य भरपूर

---

* सर्व जीव जगण्याची इच्छा धरतात, मरण्याची नाहीं, आणि म्हणून हे निग्रंथ साधु ! हें घोर पाप करण्याचें वर्ज्य कर

† परिशिष्ट २ पहा.

§ डाबर तलाव– बारा मैल लांबीचें सरोवर आग्र्यापाशीं अकबरानें खोदविलें होतें आणि त्यास डाबर नाव दिलें होतें

आहे. तेव्हा जिभेच्या लालसेकरिता दुसऱ्या जीवाचें प्राणहरण क
पार आहे असें मला वाटतें. आणि म्हणून अशा प्रकारची हिंसा स
बंद झाली पाहिजे.'

बादशहा अकबर पुढें पुढें सूरीश्वराच्या शिष्यांच्या उपदेशानें इतक
अहिंसाप्रेमी झाला कीं त्यानें वर्षाच्या कित्येक महिन्यात आपल्या सव
राज्यामध्यें कोणत्याही प्रकारची जीवहिंसा करण्यास मनाई करणारीं अशी
फर्मानें काढलीं.

काबूल कंदाहारपासून अमदनगरपर्यंत आणि कराचीहून कलकत्त्या-
पर्यंत पसरलेल्या आणि ज्यात हिंदु, मुसलमान, पठाण, गुरखे, शिधन
इत्यादि निरनिराळ्या धर्मांच्या लोकांचा भरणा आहे, ज्यात मांसाहारावर
चढलेल्या प्रत्येक सैनिकापासून थेट दिल्लीच्या सरदार राहतात अशा
अवाढव्य साम्राज्यामध्यें कित्येक महिने जीवहिंसा बंद करण्याचीं कडक
फर्मानें काढणें हें अकबराचें दिव्य साहस नाहीं का ?

९

फत्तेपूरशिक्रीत व आसमंतात् सूरीश्वरानीं तीन वर्षें काढलीं. आता
सूरीश्वराचा सहवास मिळण्यासाठीं गुजरातमधील त्यांचा शिष्यवृंद फार
उत्सुक झाला होता. अकबराच्या दरबारीं येण्याचा सूरीश्वराचा हेतु देखील
आता सफल झाला होता. पुन्हा जैन साधूना एके ठिकाणीं फार काल वास्तव्य
करता येत नसल्यामुळे सूरीश्वरानीं गुजरातमध्यें विहार करण्याचें ठरविलें.

सूरीश्वराचा विहार करण्याचा मानस जैताशाह व थानसिंह यांना कळला.
तात्काळ दोघेजण उपाश्रयात गेले आणि त्यानीं सूरीश्वरांना थोडीं महिने
विहार करण्याचें तहकूब करण्यास सांगितलें. जैताशाहाची इच्छा सूरीश्वरांच्या
हातून दीक्षा घेण्याची होती, आणि त्यास पुढें बादशहाचें अनुमोदन होतें.
तेव्हां सूरीश्वरानीं विहार करण्याचें रद्द करून जैताशाहाच्या दीक्षामहोत्सवा
साठीं एक शुभ दिवस नक्की केला.

उपाश्रयामध्यें या धामधुमीत चालत असतांना अब्दुल फजल आला.
फत्तेपूरशिक्रीमध्यें सूरीश्वरांचा मुक्काम तीन महिन्यांनीं वाढलेला पाहून
त्यास फार आनंद झाला. नंतर त्यानें सूरीश्वरांना बादशहास भेटण्यासाठीं

आमंत्रण दिलें. सूरीश्वरानीं तें मोठ्या आनंदानें स्वीकारून दुसऱ्या दिवशीं सकाळीं भेट घेण्याचें ठरविलें.

फजलनें भेटीची वेळ बादशहास कळवून तो दुसऱ्या दिवशीं सकाळीं सूरीश्वराना घेऊन राजमहालात आला. बादशहा त्या दोघांची वाटच पाहात होता. सूरीश्वराचे आगमनवेळीं बादशहानें त्यांचें स्वागत केलें. नंतर ते तिघेजण आपापल्या जागीं स्थानापन्न होताच फजलनें बोलण्यास सुरवात केली. तो म्हणाला, 'जहापनाह, आपल्या शहरामध्यें जैताशाहशेट सूरीश्वराजवळ दीक्षा घेणार आहेत, आणि त्यासाठीं येथें सूरिजीमहाराज तीन महिने मुकाम करणार आहेत.'

'अहाहा ! सूरीश्वराचा सहवास आपणास जितका लाभेल तितका हवाच.' असे उद्गार काढल्यानंतर सूरीश्वराकडे वळून तो म्हणाला,

'पण आपण येथून गुजरातकडेच विहार करणार आहात ना?'

'राजन्, आज तसा विचार आहे. तीन महिन्यानंतर जी परिस्थिति उत्पन्न होईल त्यावर विहाराचें अवलंबून राहील.'

'इतक्या उतारवयामध्यें आपण लांबचा प्रवास करण्यापेक्षा आपण येथें वास्तव्य करून आपल्या शिष्यावर आता सर्व कामगिरी सोपवाल तर बरें होईल.'

'राजन्, आम्हास एका ठिकाणीं जास्त काल राहण्याची मनाई आहे. प्रवासामध्यें होणाऱ्या कष्टाची आम्ही पर्वा करीत नाहीं. कारण हा देह पडला क्षणभंगुर.'

'महाराज, प्रवासामध्यें होणाऱ्या कष्टाबद्दल व गैरसोयीबद्दल आपणास काहीं वाटत नसेल पण आम्हास तो एक चिंतेचा विषय होईल. पुन्हा मला धर्मबोध मिळण्याचें त्यामुळें बंद होईल. तेव्हा आपण येथें स्थिरता करावी.'

सूरीश्वर बादशहास काहीं उत्तर देणार इतक्यात फजल म्हणाला, 'सूरी-महाराज, आपल्या सहवासामुळें बादशहास आनंद होतो. आपल्या सान्निध्या-मुळें त्याचे विचार जैन धर्माकडे वळले जातात.'

फजलला उत्तर देताना सूरीश्वर म्हणाले, 'शेखमहाराज, आपण म्हणणें ठीक आहे. परंतु जगामध्यें जेथें जेथें दया, सत्य, प्रामाणिकता आणि

आहे. मला जर येथें राहता येणें शक्य असतें तर मीं इतका आग्रह घेतलाच नसता. बादशहास बोध देण्याविषयीं मीं एक योजना ठरविली आहे. माझ्यामागून शांतिचंद्रजी बादशहास धर्मबोध देण्याचें कार्य करतील आणि गुजरातमध्यें पोहोंचल्यावर माझे पट्टशिष्य विजयसेनसूरींना शक्य तेंवर लवकर पाठविण्याचें मी करीन.'

सूरीश्वराच्या या उत्तरामुळें बादशहास संतोष वाटला. नंतर त्यानें अब्दुल फजलला विचारलें, 'अब्दुल फजल, उद्या सूरीश्वराना 'जगद्गुरु' पदवी देण्यासाठीं दरबार भरविण्याची व्यवस्था झाली आहे ना?'

'होय महाराज काल रात्रीं राजा मानसिंग आणि बिरबल भेटले होते. आणि ते दोघे या तयारीतच आहेत असें ते म्हणाले' अब्दुल फजलनें खुलासा केला

नंतर बादशहानें सूरीश्वराना पदवीदानसमारंभास आपल्या शिष्यांसह हजर राहण्याचें आमंत्रण दिलें.

त्या वेळीं सूरीश्वरानीं बादशहास फार मननीय उत्तर दिलें. ते म्हणाले, 'राजन्, माझ्यावर असलेल्या प्रेमामुळें आपण जो माझा सन्मान करण्यास प्रवृत्त झाला त्यास मी लायक नाहीं जगामध्यें मैत्रीभावना राखून सकल प्राणिमात्राचें हित इच्छिणें हें आमचें कर्तव्य आहे. हें कर्तव्य करीत असताना आम्ही फलाची, कीर्तीची हाव धरता कामा नये. वास्तव आपण आपली पदवीदानाची योजना मागें घ्यावी अशी माझी आग्रहाची विनंति आहे.'

सूरीश्वराच्या या विनतीस उत्तरादाखल बादशहा म्हणाला, 'आपलें म्हणणें सामान्य माणसास लागू आहे, तुमच्यासारख्या धर्मात्म्यास नव्हे. आमच्या पदवीनें आपला मान वाढणार नसून आमच्या पदवीचीच किंमत वाढणार आहे !'

सम्राट् अकबराच्या आग्रहास मान देणें सूरीश्वराना भाग पडलें. सूरीश्वरानीं कबूल केल्यानंतर बादशहा त्याना म्हणाला, 'महाराज, आता आपण लवकर विहार कराल तेव्हां आपली कांहीं इच्छा असल्यास मला कळवा.'

'राजन्, आपण जीवदयेचीं आणि लोकोपयोगी कार्ये करीत आहात ही मोठी समाधानाची गोष्ट आहे. माझी इच्छा आहे कीं आपण आमच्या

तीर्थस्थानाचें रक्षण करण्याची जबाबदारी घ्यावी व तेथें यात्रेकरूंकडून जो कर घेण्यात येतो तो माफ केला जावा.'

'अरेरे! अल्लाच्या दरबारामध्यें जाणाऱ्यापासून कर घेणें हे तर जिजिया करापेक्षा अधिक दुष्ट आहे या गोष्टीची आपण मला माहिती देऊन सावध केलें हें योग्य झालें. दुसरें, आपलीं हीं जीं तीर्थस्थानें आहेत तीं आपल्या स्वाधीन केलीं तर काहीं हरकत नाहीं ना? आज मीं एक फर्मान काढून या तीर्थस्थानाचा अधिकार आपणाकडे सोपवितों'*

यानंतर सूरीश्वर स्वस्थळीं निघून गेले. दुसऱ्या दिवशीं पदवीअर्पणासाठीं खास दरबार भरविण्यात आला. अकबराच्या पदरीं असलेले मोठमोठे सरदार आणि विद्वान् या समारंभास हजर होते त्यात सूरीश्वराना 'जगद्गुरु' ही पदवी अर्पण करण्यात आली. ह्या पदवीदानावरून बादशहाच्या मनाचें पृथक्करण करता येईल त्याची खात्री झाली असावी कीं सूरीश्वर हे एक असाधारण विद्वान् साधु आहेत आणि त्यांच्या विद्वत्तेवरून आणि उच्च चारित्र्यावरून ते जैनांचेच नव्हे तर जगाचेही गुरु होण्यास लायक आहेत. ह्या पदवीदानसमारंभाची शोभा काय वर्णावी! त्या वेळीं कित्येक कैद्यांना सोडण्यात आलें पांजरपोळमधील कित्येक पक्ष्यांची सुटका करण्यात आली. फत्तेपूरशिक्रीमधील श्रावकांना तर अत्यानंद झाला. या आनंदी वातावरणात सूरीश्वराच्या हातून जैताशाहाचा दीक्षामहोत्सव ठरलेल्या वेळीं उरकण्यात आला प्रत्यक्ष बादशहानें या समारंभाला द्रव्याची मदत केली पण हें आज कित्येकांना खरें वाटेल का?

## १०

लक्ष्मी चंचल आणि वैभव ऊन सावलीप्रमाणें आहे. असें नसतें तर अनाढ्य मोगल साम्राज्य का कोसळावें? अथवा एके काळीं अकबराची प्रसिद्धि पावलेल्या फत्तेपूरशिक्रीसारख्या सुंदर शहराची केविलवाणी स्थिति का

* हें फर्मान दोन फूट लांब आणि दीड फूट रुंद अशा पाद या वस्त्रावर सोनेरी अक्षरांनीं लिहिलेलें आहे आणि तें बादशहा मोहोर, शिक्का, सहीमहित अमदाबादमध्यें अजून उत्तम स्थितींत आहे.

स्थानी ! अकबराच्या वेळच्या त्या विराट आणि वैभवशाली शहराकडे पाहिलें म्हणजे कफल्लक झालेल्या एका श्रीमंताची आठवण होते. हजारों हत्ती, घोडे इत्यादि प्राणी असलेल्या सरकारी पागेमुळें हें शहर शोभिवंत झालें होतें. शेकडों स्त्रिया असलेल्या अंतर्गृहामुळें हें शहर अकबराचें आणि जळ या चेंडूच्या साह्यानें रात्रीं पोलो खेळ खेळणाऱ्या तरुण आणि रंगेल सरदारांचें तें एक विलासस्थान होतें. हिंदी आणि पर्शियन चित्रकला यांचा सुंदर समन्वय करणाऱ्या कलावंतांचें तें माहेरघर होतें आणि दिने इलाही (ईश्वराचा धर्म) नांवाच्या अकबरानें स्थापन केलेल्या धर्माचें तेंच जन्मस्थान होतें. पण आज आपणास तेथें काय दिसेल ? कांहीं पडलेल्या लाल रंगाच्या भिंती आणि कांहीं नयनमनोहर राजवाड्यांचा अवशेष. पण हे अवशेष देखील आज आशिया खंडात एक आश्चर्य म्हणून प्रसिद्ध आहेत. दिवाने खास मधील कोरीव कामाबद्दल प्रसिद्ध असलेला त्याचा पंचमहाल आणि राजवाड्यापेक्षांही सुंदर असें थडगें फत्तेपूरशिक्रींत पाहिल्यानंतर मन क्षणभर गुंग होतें.

अकबराचा सुरुवातीचा बराच काल निरनिराळे देश जिंकण्यांत आणि स्थिरस्थावर करण्यांत गेला. त्याच्या राज्यांत शांतता प्रस्थापित झाल्यानंतर त्यानें फत्तेपूरशिक्री हें शहर बांधलें. याच सुमारास अब्दुल फैजी आणि फजल या बंधुद्वयाबरोबर त्याची ओळख झाली. त्या दोघांच्या स्वतंत्र विचारसरणीचा अकबराच्या मनावर फार परिणाम झाला आणि त्यानें 'इबादतखाना' (धर्मसभा) फत्तेपूरशिक्रीमध्यें बांधून त्यांत धार्मिक प्रश्नावर वादविवाद करण्याच्या प्रथेस सुरुवात केली. प्रथम कांहीं मौलवी मंडळी (सुन्नी उलेमा) एकत्र येऊन वादविवाद करीत. या मंडळीमध्यें होत असलेली चर्चा ऐकण्यासाठीं अकबर दर शुक्रवारीं नियमितपणें येत असे. पण 'वादे वादे जायते तत्त्वबोध' या म्हणीस अनुसरून कांहीं तत्त्वबोध मिळण्याच्या ऐवजीं मौल्वींच्या भांडणाचा निवाडा लावण्याचें घटाळवाणें काम अकबरावर पडूं लागलें. याच सुमारास अकबराची मुसलमानी धर्मावरील श्रद्धा कमी झाली. मशिदींमध्यें जाण्याचें त्यानें सोडून देऊन निरनिराळ्या धर्मपंडितांना धर्मासंबंधीं चर्चा करण्यास त्यानें पाचारण केलें. अब्दुल फजलच्या लिखाणावरून मुसलमान, पारशी, जैन, हिंदु, नास्तिक इ० पंथीय धर्म

गुरु, कायदेशास्त्री, मोठमोठाले वक्ते इबादतखान्यामध्यें चर्चा करीत आणि आनंद मिळवीत. या चर्चेमुळें मुसलमान धर्मावरील अकबराचा विश्वास पूर्णपणें नाहींसा होऊन त्याचें मन पारशी, जैन आणि हिंदु या धर्मांकडे ओढलें गेलें.

अकबराच्या दरबारीं जे विद्वान् गृहस्थ आले त्यांची संख्या एकर्शें चाळीस पर्यंत होती.* सूरीश्वरानंतर जैन धर्माचा उपदेश करण्याचे कार्य उपाध्याय श्रीशांतिचंद्र,§ आचार्य विजयसेनसूरि,† श्रीभानुचंद्र आणि श्रीसिद्धिचंद्र यानीं केलें आहे. सूरीश्वरावरील बादशहाचें प्रेम हें सूर्यप्रकाशाइतकें स्पष्ट होतें आणि सूरीश्वराच्या शिष्यांवरही हें प्रेम त्यानें कायम ठेवलें. शांतिचंद्राच्या शतावधानानें आणि काव्यशक्तीनें तो मोहित झाला होता. आचार्य विजयसेनसूरींच्या वादविवादकुशलतेमुळें आणि विद्वत्तेमुळें प्रसन्न होऊन 'सवाई विजयसेन' नांवाची पदवी त्यानें त्यांना अर्पण केली होती. दर रविवारीं सूर्यसहस्रनामाचे श्लोक तो भानुचंद्राकडून ऐकत असे आणि फारसी भाषा व वाङ्मय एखाद्या मौलवीकडून न शिकतां भानुचंद्राकडून तो शिकला होता. हे सर्व प्रसंग काय दर्शवितात? या सर्व जैन साधूंचें अकबरावर अत्यंत वजन होतें हेंच यावरून सिद्ध होत नाहीं काय? अकबराच्या दरबारीं असलेल्या कट्टर इस्लामी इतिहासकार बदाउनीनें‡

* ह्या एकर्शेंचाळीस सभासदांचे पांच वर्ग पाडण्यांत आले होते ह्यांत सूरिश्वराचें नांव (हीरजाबर) पहिल्या वर्गांत आणि विजयसेनसूरि व सिद्धिचंद्राचें नांव पांचव्या वर्गांत आढळून येतें.

§ श्रीशांतिचंद्रजी – कृपारस काव्याचे कर्ते

† श्रीविजयसेनसूरिः– प्रखर विद्वान् होते. हेमचंद्राचार्यकृत योगशास्त्राच्या पहिल्या श्लोकाचे यानीं सातशें अर्थ केले होते. असें सांगण्यात येतें कीं ह्यानीं लाखों जिनबिंबांची प्रतिष्ठा केली होती. वयाच्या ५८ व्या वर्षी हे स्वर्गवासी झाले बादशहा जहांगिरानें ह्यांच्या स्तूपाकरितां दहा बिघे जमीन इनाम दिली, तीन दिवस निरनिराळे बाजार बंद करण्यांत आले.

‡ बदाउनी – इतिहासलेखक. कट्टा सुन्नीपंथी असल्यामुळें याला अकबराचें धार्मिक धोरण पसंत नव्हतें फजलच्या लेखांत अकबराची स्तुतिच मुख्यतः असल्यामुळें विरुद्ध बाजू समजण्याच्या दृष्टीनें याच्या लिखाणाचा फार उपयोग होतो.

ही गोष्ट कबूल केली आहे. तो म्हणतो, 'सम्राटानें इस्लाम धर्माचा त्याग केला होता त्यास अनेक कारणें होतीं. मुख्य कारण असें होतें कीं निरनिराळ्या देशाचे व निरनिराळ्या धर्मांचे अनेक विद्वान् निर्भयपणानें दरबारामध्यें येत आणि बादशहाबरोबर प्रत्यक्ष वार्तालाप सहृदयपूर्वक करीत. रात्रंदिन तो धर्मासंबंधीं विचार करी. आणि त्याचें यथार्थ मूळ काढल्याशिवाय दुसऱ्या कोणत्याही कार्याकडे तो लक्ष देत नसे. सम्राट् विशेषेंकरून मुसलमानेतराचे विचार जाणून घेई. ज्या ज्या गोष्टी त्यास पटत त्याचा तो स्वीकार करी.

'विशेषत' अन्य संप्रदायाच्या विद्वानांपेक्षा श्रमणसाधु आणि ब्राह्मण पंडित ह्यांची तो एकान्तात भेट घेई आणि चर्चा करी. हे साधु आणि पंडित धर्मतत्त्व आणि नीतिशास्त्र यामध्यें दुसऱ्या धर्मांच्या विद्वानांपेक्षा अधिक प्रवीण होते आणि त्यामुळें स्वतःच्या अभिप्रायांना प्रामाणिक ठरविण्यासाठीं युक्ति आणि प्रमाणांवर आधारभूत झालेल्या गोष्टी ते त्यास निवेदन करीत आणि ते आपल्या धर्माचें समर्थन इतक्या दृढतेनें करीत कीं त्यांच्याविरुद्ध सम्राटाच्या मनात संशय उत्पन्न करण्याची कोणाची छाती नसे.'

सूरीश्वरानीं अकबरास जो अहिंसाधर्म शिकविला त्याचें पालन त्यानें आपल्या मृत्यूपर्यंत केलें आहे. सूरीश्वराच्या शिष्याच्या उपदेशानें अकबरानें जिजिया कर, निर्वंशाची मिळकत जप्त करण्याची सरकारी प्रथा आणि विक्रेऊ महिनेपर्यंत कत्तलखाने बंद करण्याचे कायदे जारीनें अमलात आणले.

जैन, हिंदु अथवा पार्शी या धर्मांवर अकबराचें प्रेम होतें तरी अकबर कोणत्याही एका संप्रदायामध्यें स्थिर होईल ही गोष्ट अशक्य होती. त्याचें मन मधमाशीप्रमाणें होतें. सुगंधित फुलांतून रस चोखल्यानंतर मधमाशी दुसऱ्या फुलावर बसते तसें जैनांच्या उत्कृष्ट तत्त्वाचा स्वीकार केल्यानंतर अकबराचें मन हिंदूंच्या तत्त्वाकडे आकर्षिलें गेलें असावें. तेथून तें उडून पारश्यांच्या सूर्योपासनेकडे वळलें असावें. तो सर्व धर्मांचा उपासक होता आणि कोणत्याही एका धर्मावर आग्रह नव्हता. सत्याचा तो सहृदयक शोधक होता. संकुचितपणाचा तो तीव्र विरोधक होता.

पण या सत्यशोधकास फजलच्या संगतीमुळें धर्मसंस्थापक होण्याची लालसा उत्पन्न झाली. 'दिने इ इलाई' ह्या लालसेचाच परिपाक आहे. टोडरमल, मानसिंघ, फजल, फैजी इत्यादि मंडळी या नवीन धर्मात सामील झाली. पण ह्यानें काढलेला धर्म अल्पजीवी राहिला. तो अल्पजीवी राहिला हें उत्तम झालें. ज्याच्या ठिकाणीं नीतिमत्तेचें भरपूर भांडवल नव्हतें, ज्यानें स्वतःमबधीं भ्रामक कल्पना केल्या होत्या, अशा अविवेकी अक्बराचें धर्म स्थापण्याचें साहस सुंदर ठरलें नाहीं यात वावगें ते काय ?

## ११

सुरीश्वर हे एक जैन आचार्य होते. जैन आचार्यांच्या जीवनचरित्रात प्रेमाचें वर्णन, पराक्रमाची प्रशंसा थोडीच आढळणार. कोणत्याही निग्रंथ साधूच्या सहवासात या. काय आढळेल ? विद्या, वीतरागता आणि वैराग्य या रत्नत्रयींची उत्कृष्ट उपासना. ही उपासना ते अखंड आणि अत्यंत उत्साहानें करीत राहतात. 'वैरागी राजा' भर्तृहरि म्हणतो— ज्यानें विद्या संपादन केली नाहीं, उत्तम तपश्चर्या केली नाहीं, ज्याच्याजवळ नितिमत्तेचें बळ नाहीं अथवा ज्यानें सद्धर्माचें पालन केलें नाहीं, तो मानव नसून पशु आहे. पण जो या सर्व गुणांचा समुच्चय आहे, सागर आहे, असा जैन साधु खरोखर देवदूत नाहीं का ?

सूरीश्वराच्या डोक्यात जिनशासनाचे विचार अहोरात्र घोळत होते. जिनशासनाचा डंका भारतांत गाजावा, जिनवाणीचें भरण करून आणि त्याप्रमाणें वर्तन करून श्रावकांनीं पुण्यागोविंदानें राहावें, जैन तीर्थांचें परकीयापासून संरक्षण व्हावें आणि जीवदयेचीं व भूतदयेचीं कार्यें सतत साम्राज्यात चालू असावीं यान्व्यतिरिक्त कोणते विचार त्याच्या हृदयाला स्पर्श करू शकले असतील ?

फत्तेपूरशिक्रीस वास्तव्य करण्यास हेच विचार कारणीभूत झाले. आणि याच विचारामुळें सूरीश्वराचा सम्राटाच्या निरनिराळ्या सुभेदार-सरदाराबरोबर परिचय झाला आणि ह्या सर्वांना प्रतिबोधण्याचें सुभाग्य सूरीश्वराना लाभलें. पण या अन्यायी आणि अनियंत्रित सुभेदारावर छाप पाडणें हें विचारी आणि विद्याप्रेमी अकबरास उपदेश करण्यापेक्षा अवघड होतें. हे सुभेदार-

सरदार मुसलमानी धर्माचे असल्यामुळें त्यांच्यामध्यें व सूरीश्वरामध्यें धार्मिक प्रश्नावर चर्चा हटकून होत असे. आणि या चर्चेमध्यें सूरीश्वराचा हमखास विजय होत असे.

पाटणमध्यें सूरीश्वराची होत असलेली प्रशंसा ऐकून त्याना भेटण्याची सुभेदार कलाखानानें इच्छा प्रकट केली. भेटीमध्यें निरनिराळ्या विषयावर बोलणें झाल्यावर चंद्र उच्च कीं सूर्य उच्च या विषयावर वादविवाद सुरू झाला. चंद्र उच्च आहे असें सूरीश्वरानीं प्रतिपादन केलें. पण कलाखानास तें पटलें नाहीं. कारण त्याच्या धर्ममध्यें याच्या अगदीं उलट लिहिलें होतें. ही वस्तुस्थिति पाहून सूरीश्वर म्हणाले, 'मी कांहीं सर्वज्ञ नाहीं अथवा माझ्या चर्मचक्षूनीं उच्च कोण हें पाहिलें नाहीं. माझ्या गुरुकडून जें मला समजलें आणि माझ्या शास्त्रांत जें मीं वाचलें तें मीं निवेदन केलें. तुमच्या कुराणामध्यें तुम्ही सांगता त्याप्रमाणें लिहिलें असेल तर तुम्ही त्यावर विश्वास ठेवा. कांहीं हरकत नाहीं.'

सूरीश्वराचें सरळ उत्तर ऐकून कलाखान संतुष्ट झाला. अहदय गोष्टीवर हट्टास पेटणें व त्यावर भांडणें मूर्खपणाचें आहे हें त्यानें ओळखलें आणि देहान्त शिक्षा झालेल्या कैद्याना जीवदान दिलें व सबंद माहिनाभर जीवहिंसाप्रतिबंधक हुकूम काढला. हा सूरीश्वराच्या वाणीचा परिणाम.

अमदाबादच्या आझमखानास सूरीश्वराच्या समाजावर असलेल्या वजनाची जाणीव होती म्हणून त्यानें सूरीश्वराची भेट घेण्याची इच्छा दर्शविली. सूरीश्वराना देखील आझमखानास भेटण्याची जरूरी होती. कारण अकबराकडून मिळालेल्या जैन तीर्थावर जैनाच्या मालकी हकासंबंधींचें जें फर्मान निघालें होतें त्याची अम्मलबजावणी बरोबर होत नव्हती.

भेटीमध्यें आझमखानानें तीर्थंकराची माहिती मिळविली. नंतर तो सूरीश्वराना म्हणाला, 'आपण कित्येक वर्षांपासून फकिरी पत्करली आहे. ह्या दीर्घ कालामध्यें कांहीं चमत्कार उत्पन्न करणारी विद्या आपण अवगत केली का? अथवा अल्लाशीं आपली भेट झाली का?'

खानाच्या प्रश्नास उत्तर देताना सूरीश्वर म्हणाले, 'खानसाब, अल्लासंबंधीं आमच्या कल्पना निराळ्या आहेत. सृष्टि उत्पन्न करणारा कोणी अल्ला असेल असें आम्ही मानीत नाहीं. तेव्हां त्यांची व माझी भेट कशी

होणार ? पुन्हा कचन व कामिनी याचा त्याग करून आम्ही साधु होतों. तेव्हा नवीन चमत्कार दाखवून जगास चमत्कृत करण्याची आम्हास जरूरी का वाटावी ? मात्र चमत्कारिक विद्या पूर्वी होत्या आणि काहीं महात्म्याना त्या अवगतही होत्या. पण आज ते थोर पुरुष राहिले नाहींत. पण त्या मुळें आम्ही वाईट वाटून घेत नाहीं. कारण आम्हा साधूजवळ चारित्र्य-रुपी किमया असली म्हणजे त्या द्वारें आम्ही पुष्कळ चमत्कार दाखवू शकतों.'

नतर मुसलमानानाच ईश्वरप्राप्ति मिळते, हिंदूना मिळत नाहीं, हें तत्त्व सिद्ध करण्यासाठीं आझमखानानें जी हास्यकारक गोष्ट* सांगितली तींतील चुका सूरीश्वरानीं दाखविल्या आणि जो धर्मानें वागतो त्यास मुक्ति मिळते हें त्यानीं आझमखानास पटवून दिलें. या प्रसगानतर सूरीश्वराना भेटण्याची कोणतीही सधि तो गमवीत नसे.

याप्रमाणें सूरीश्वरानीं अकबरपुत्र मुराद, कासिमखान, खानखानान, मीर्जा अब्दूल, रहीम, सुल्तान हबीब्बुलाह इ० अनेक सुभेदारावर आपली छाप पाडली.* आणि त्याच्यापैकीं बहुतेकाकडून अनेक कार्यें करवून घेतलीं. त्यात जीवहिंसाबदी, कारागृहातून कैद्याची सुटका हीं प्रमुख आहेत. जैन श्रावकावर अन्याय होत असताना ते झगडले आहेत. त्या अन्यायाचें परिमार्जन करण्यासाठीं त्यानीं आपल्या वजनाचा सदुपयोग केला आहे, उदा० रायकल्याण नावाचा सरकारी अमलदार खबायतच्या जैन श्रावकाना फार उपद्रव देत असे. त्याच्या जुलमामुळें कित्येक श्रावकानीं प्राण वाच-विण्यासाठीं धर्मांतर केलें होतें. श्रावकाना उपद्रव करून तो थाबला नाही. त्यानें एका जैन मदिराची विटबना केली या प्रकरणामुळें सबद गुजरातमध्यें हाहा कार माजला. सूरीश्वरानीं बादशहा अकबर आणि सुभेदार मिर्झाखान याच्या मदतीनें रायकल्याणाचा योग्य बदोबस्त करविला आणि धर्मान्तर केलेल्या श्रावकाचें आणि जैन मदिराचें शुद्धीकरण केलें

सूरीश्वरानीं आपल्या वाणीनें आणि विद्वत्तेनें जिनशासनाची महान् सेवा केली आहे आणि म्हणून श्रेष्ठ जैनाचार्यांच्या नामावलींत त्याचें नाव गोवण्यात येतें.

* विशेष माहितीसाठीं श्रीविद्याविजयजीकृत सूरीश्वर सम्राट ग्रंथ पान १७९ पहा.

## १२

कल्पना करा. सूरीश्वरकालीन एक जैन श्रावक दोन चार महिने भारतात येऊन राहिला. त्यानें निरनिराळ्या जैन तीर्थस्थानांचीं दर्शनें घेतलीं. जैनाच्या निरनिराळ्या आचार्यमहाराजांचीं व्याख्यानें त्यानें ऐकलीं. एखादा दीक्षामहोत्सव त्याच्या पाहण्यात आला. ठिकठिकाणीं निर्माण झालेलीं जैन विद्यालयें, आश्रम, वसतिगृहें याना भेटी दिल्या. त्याच्या मनावर काय परिणाम होईल ? जैनसमाजाबद्दल त्यास काय वाटेल ?

रस्त्यामध्यें भरधाव पळणाऱ्या मोटारी, आगगाड्या, पोस्ट ऑफिस, आपलीं घरें, आपले कपडे, भाषा इ० पाहून आपण आपल्या समकालीन श्रावकांच्या वंशजात राहात आहोंत हें त्यास कळणार सुद्धा नाहीं. इतका बदल आपणामध्यें झाला आहे. हा काळाचा महिमा. दुसरें काय ?

सूरीश्वरकाळीं प्रवास पायीं अथवा बैलगाडीनें करावा लागे. यामुळें एका शत्रुंजयची यात्रा करण्यास कित्येक महिने सूरीश्वरकालीन श्रावकास लागत असतील. आज तीच यात्रा एक आठवड्यात करून मनुष्य घरीं येऊं शकतो. म्हणून प्रत्येक वर्षी शत्रुंजयची यात्रा करणारे आज कित्येक सापडतील. सूरीश्वरकालीन सबंद आयुष्यामध्यें एक दोन यात्रा मोठ्या कष्टानें होत असतील. पण पूर्वीच्या यात्रा, यात्रा करण्यासाठीं होत्या, उन्हाळ्यामध्यें हवा खाण्यासाठीं अथवा व्यापारधंद्यास कटाळून तीर्थ स्थानाच्या केलेल्या सफरी त्या नव्हत्या. शेकडो साधु आणि हजारों श्रावका-बरोबर सूरीश्वरानीं केलेल्या सिद्धाचलयात्रेचें वर्णन वाचल्यानंतर असें आढळून येतें कीं त्या वेळीं फार थोडीं मंदिरें शत्रुंजय पर्वतावर असावींत. पण आज तेथें हजारों मूर्ति आढळतील. आज एखादा श्रावक दीक्षा घेत असला तर समाजामध्यें निरनिराळे विचारतरंग उत्पन्न होतात. साधु आणि श्रावकामध्यें तटे होण्यापर्यंत पाळी येते. सूरीश्वरकाळीं अशा प्रकारचे तटे होत पण त्या वेळीं एकाच्या संसारत्यागामुळें दुसऱ्यास उत्तेजन मिळे आणि अशा रीतीनें कित्येक, केव्हां केव्हा सबंद घरच्या घर, दीक्षा* घेत

* सूरीश्वर सम्राट् पान २११, २१५–२१७.

असे. आज ती स्थिति नाहीं. स्याद्वादवादी सूरीश्वरानीं स्वत च्या आयुष्यात पन्नास प्रतिष्ठामहोत्सव उजविले. त्याच्या उपदेशामुळें पाचशें मंदिरें बांधण्यात आलीं. पण त्या वेळीं मंदिराची आवश्यकता होती म्हणून तीं बांधण्यात आलीं पूर्वी मुसलमानी जुलमामुळें कित्येक मंदिरें नष्ट झालीं होतीं. भ्रष्टाकाराच्या भयामुळें कित्येक मूर्ति गुप्तस्थळीं ठेवण्यात आल्या होत्या

सूरीश्वरकाळच्या आणि सध्याच्या समाजप्रवृत्तीमध्यें फार तफावत पडली आहे. सूरीश्वरकाळामध्य धनिकाच्या संपत्तीचा ओघ प्रतिष्ठामहोत्सव साजरा करण्यात, संघ काढण्यात आणि मंदिरें बांधण्यात झाल्ला होता. आजही काहीं प्रमाणात ही प्रवृत्ति आढळून येते. पण जेव्हा सूरीश्वर काळामध्यें मूर्तिपूजेला फारसा विरोध नव्हता तेव्हा आज श्वेतांबरपर्थाय अर्धा समाज मूर्तिविरोधक झाला आहे समाजास उपयोगी पडतील अशा संस्था– विद्यालयें, वसतिगृहें, दवाखाने इत्यादि– उघडण्याची तळमळ सर्वत्र आढळून येत आहे थोडक्यात, सूरीश्वरकालीन समाज जास्त धार्मिक प्रवृत्तीचा होता, आजच्या समाजाचा कल बुद्धिवादाकडे आहे

जग पालटत असताना जैनसमाज जागच्या जागीं राहू शकत नाहीं जुनी व्यवस्था अथवा घडी बदलून समाज नवीन कल्पना, नवीन विचार ग्रहण करण्यास उत्सुक आहे पण या नवीन कल्पनामुळें, नवीन विचारा मुळें, भगवान् महावीरानें प्रवर्तिलेल्या शिकवणुकीचा आणि तत्त्वज्ञानाचा लय होणार नाहीं कारण ती शिकवणूक आणि तें तत्त्वज्ञान शाश्वत सत्यावर उभारलेलें आहे.

## १३

सिद्धाचलयात्रा करण्यासाठीं सूरीश्वराबरोबर कित्येक ठिकाणचे संघ आले होते त्यातील ऊना येथील श्रीसंघानें फार आग्रह केला म्हणून सूरीश्वरानीं ऊना येथें चातुर्मास घालविलें. विहार करण्याची वेळ जवळ येऊ लागली. सूरीश्वर तयारी करू लागले पण त्यांची प्रकृति चांगली नसल्या मुळें श्रीसंघ विहार करण्यास परवानगी देत नव्हता, पण विहार रद्द केला

तरी सूरीश्वरांना शांति मिळेना. त्यांच्या रोगाचें स्वरूप दिवसेंदिवस उग्र होऊं लागलें. सूरीश्वरांना औषधोपचार करण्यासाठीं श्रावकांनीं फार खटपट केली. पण औषध घेण्यास ते तयार होईनात. स्वतःच्या आत्म्यासाठीं आणि परोपकारासाठीं हें शरीर टिकविणें जोंपर्यंत आवश्यक होतें तोंपर्यंत अन्नपाणी ग्रहण करून सूरीश्वरांनीं तें टिकविलें. तोंपर्यंत तें टिकविणें हें पुण्यकर्म होतें. पण वार्धक्यानें आणि रोगानें जर्जर झालेल्या शरीरावरून ममत्व कमी करणें हेंही धर्माचें अंग आहे अशी सूरीश्वरांची भावना होती. सूरीश्वरांना वाटत होतें कीं जगण्यासाठीं जगावयाचें नाहीं, तर आत्मोद्धारासाठीं, परोपकारासाठीं, जगावयाचें.

पण सूरीश्वरांसारखे मत थोडेच असतात. सूरीश्वरांच्या औषध घेण्याच्या नकारामुळें श्रावकांना वाईट वाटूं लागलें. त्यांनीं सूरीश्वरांना फार आग्रह केला. शेवटीं अन्नपाणी घेण्याचें त्यांनीं सोडून दिलें. ही परिस्थिति पाहून सोमविजय नांवाच्या एका साधूनीं सूरीश्वरांची समजूत घालण्याचा प्रयत्न केला. रोगनिवारणार्थ मोठमोठ्या आचार्यांनीं औषध घेतल्याचीं जुनीं उदाहरणें दाखविलीं आणि संघाचा मान ठेवण्यासाठीं तरी औषध घेण्याचें सुचविलें.

शेवटीं आपल्या इच्छेविरुद्ध सूरीश्वरांनीं औषध घेण्याचें ठरविलें. तज्ज्ञ वैद्यांनीं काळजीपूर्वक त्यांची प्रकृति तपासली. पण औषधामुळें ज्ञानध्यानक्रिया सामर्थ्य पूर्वीप्रमाणें तत्पर राहण्याइतकी शक्ति सूरीश्वरांना शेवटीं आली नाहीं. सूरीश्वरांचा आपल्या जीवनावरील विश्वास उडाला. पण मृत्यूचें दुःख सूरीश्वरांना होत नव्हतें; दुःख वाटत होतें तें निराळ्या कारणामुळें. आपल्या अंतकाळीं आपले पट्टशिष्य– विजयसेनसूरि– आपल्याजवळ नाहींत यामुळें सूरीश्वरांना वारंवार गहिंवरून येई. कित्येक दिवसापासून अंतःकरणांत पिळलेल्या महातान्यास अंतकाळीं आपल्या करवीं मुलास भेटण्याच्या इच्छेइतकीच आपल्या पट्टशिष्यास पाहण्याची सूरीश्वरांची नैसर्गिक इच्छा होती. सूरीश्वर सांसारिक नव्हते. पण सूरीश्वर फार मोठ्या व निराळ्या समाजाची काळजी वाहत होते. तपागच्छाच्या कांहीं प्रश्नांचा पट्टशिष्यास खुलासा करण्यासाठीं त्यांचें मन उत्सुक होतें. पण भविष्यांत कांहीं निराळेंच लिहिलें होतें.

सूरीश्वरांचें दुखणें, सूरीश्वराची उत्कट इच्छा विजयसेनसूरींना कळविण्यासाठीं धनविजय नावाचे साधु लाहोरकडे रवाना झाले. लाहोरास विजयसेनसूरींना भेटून त्यानीं सूरींसबंधीं सर्व समाचार सांगितले हे समाचार ऐकताच विजनसेनसूरींना जबर धक्का बसला त्याच्या शरिरात एकाएकीं शिथिलता आली. पण त्यानीं धीर धरला आणि बादशहाची परवानगी घेऊन ते ऊनाकडे जलद विहार करू लागले.

पायीं विहार विजयसेनसूरि किती जलद करणार ? त्या वेळीं आगगाड्या किंवा मोटारगाड्या नव्हत्या. पण बादशहाच्या पवनवेगी घोड्यावर स्वार होऊन सूरीश्वराना भेटण्याचें विजयसेनसूरींना विशेष अवघड नव्हतें. पण विजयसेनसूरि पडले जैन साधु जैन साधूना प्रवासासाठीं कोणत्याही साधनाचा उपयोग करण्यास प्रतिबंध आहे तेव्हा सूरीश्वराना भेटण्याची उत्कट इच्छा असली तरी पायीं विहार करण्याशिवाय मार्ग नव्हता.

कित्येक महिने निघून गेले पण विजयसेनसूरि येण्याचें चिन्ह दिसेना पुन्हा चातुर्मासास सुरुवात झाली. सूरीश्वर निराश झाले. त्याचे शिष्य व श्रावक त्याची समजूत करू लागले.

पर्युषणपर्वास सुरुवात झाली. रोगानें जर्जर झालेल्या आणि अशक्त बनलेल्या सूरीश्वरानीं स्वत कल्पसूत्र वाचलें. सर्व धार्मिक क्रिया केल्या. पण त्या परिश्रमामुळें मात्र शरीर जास्त शिथिल झालें

पर्युषणानतर तीन आठवड्यानीं भाद्रपद वद्य १० वि. स १६५२ च्या मध्यरात्रीस सूरीश्वरानीं विमलहर्ष आदि सर्व साधूना एकत्र केलें आणि त्याना उद्देशून ते म्हणाले, 'साधूनो, जगण्याची आशा मीं सोडली आहे एकदा जो जीव ज मला तो एके दिवशीं मरणार हें ठरलेलें आहे. प्रत्यक्ष तीर्थंकराना मरण चुकलें नाहीं मरण जसें कोणी टाळू शकत नाही तसें आयुष्य एका क्षणमात्रानेंही वाढविण्यास कोणी समर्थ नाहीं म्हणून आपण वृथा शोक करू नका. विजयसेनसूरि येथें हजर नाहींत कल्याणविजय भेटले नाहींत. ठीक आहे. आता मी आपणास इतकेंच सांगू शकतों कीं तुम्ही कोणत्याही प्रकारची चिंता करू नका. सत्यवादी आणि शासनप्रेमी श्री विजयसेनसूरि तुमच्या सर्व आशा पूर्ण करतील तुम्ही ज्याप्रमाणें मला मानता त्याप्रमाणें यापुढें तुम्ही त्याना मान द्या पुत्राप्रमाणें ते तुमचें

पालन करतील. सर्व करून रहा आणि जिनशासनाची शोभा वाढेल असेच वागा '

साधूंना याप्रमाणे बोध केल्यानंतर सूरीश्वर समस्त जीवांची क्षमा याचू लागले. आपल्या शिष्यांची क्षमापना करीत असताना सर्व साधूंचे हृदय भरून आलें आणि त्यांच्या डोळ्यातून अश्रुधारा वाहू लागल्या. अशा गंभीर स्थितीमध्यें सोमविजय सूरीश्वराना म्हणाले, 'गुरुदेव, आम्हा बालकांची आपण क्षमा मागावी ? आमच्या प्रत्यक्ष पित्यानें जितकें प्रेम केलें नसेल तितकें आपण आमच्यावर प्रेम केलें आहे. अज्ञानरूपी अंध कारात आम्ही रितपत पडलों होतों तुम्हीं आम्हास प्रकाश दाखविला आम्ही लहान आहोंत. पुन्हा अज्ञानामुळें आमच्या हातून आपली योग्य सेवा झाली नसेल म्हणून आम्ही सर्वजण आपली क्षमा मागतों '

यावर सूरीश्वर म्हणाले, 'आपलें म्हणणें ठीक आहे. पण माझ्याकडून आपल्यापैकीं कोणाच्या भावना दुखविल्या गेल्या असतील म्हणून आपली क्षमायाचना करावी हें मी माझें कर्तव्य समजतों '

नंतर गजजीवनाकडे दृष्टि फेकून भरत, बाहुबली, अभयकुमार, शालिभद्र, मेघकुमार वगैरे गतकालातील ऋषींची तपश्चर्या आणि शक्तीचें स्मरण करू लागले नवकारमंत्राचे ध्यानास सुरवात केली दुसऱ्या दिवसाच्या सायंकाळपर्यंत सूरीश्वर ध्यानस्त राहिले.

नंतर सावध होऊन दुसऱ्या साधूंना स्वत ज्यानजळ बसवून स्वत प्रतिक्रमण केलें प्रतिक्रमण झाल्यानंतर सूरीश्वरानीं शेवटचे उद्गार काढले—

'बंधूनो, आता मी तुमचा शेवटचा निरोप घेतों. आपण व्याकुळ होऊ नका धर्मकार्य करण्यात दिरंगाई करू नका ' इतके उद्गार काढल्यानंतर त्यानीं डोळे मिटून 'माझे कोणी नाहीं. मी कोणाचा नाहीं आत्मा ज्ञानदर्शन चारित्र्यमय आहे, सच्चिदानंदमय आहे, शाश्वत आहे. माझ्या दुःखमय शरिराचा त्याग करून मी शाश्वत सुखाचा मालक होत आहें' असे [illegible] त्यानीं काढले. जपमाळ घेऊन ती जपण्यास त्यानीं सुरवात केली. चौथी माळ जपत असतां माळ हातातून पडून गेली. लोकांमध्यें हाहा कार माजला. सूरीश्वरांची जीवनज्योत मानवी देहास सोडून निघून गेली

मखमल व मशरु यानीं मढवलेल्या, चामर, तोरण, घंटा आणि चारी बाजूंनीं फिरत्या पुतळ्या यानीं शृंगारलेल्या, पालखीमध्यें सूरीश्वराचें शव वाजंत्रींच्या गोड आवाजात आणि पुष्प व पैसे याच्या वर्षावात गावाबाहेरील एका बगिच्यात नेण्यात आलें.

पालखीमध्यें ठेवलेल्या आणि चंदनाच्या लाकडानीं वेढलेल्या सूरीश्वराच्या शवास दुःखी अंतःकरणानें आणि जड मनानें अग्नि दिला गेला. कापूर, कस्तुरी आणि केशर यानीं ती पवित्र चिता सुगंधित करण्यात आली.

अग्निसंस्कार झाल्यानंतर श्रावकानीं मंदिरामध्यें येऊन देववंदन केलें. नंतर उपाश्रयामध्यें जाऊन साधूच्या मुखातून वैराग्यमय उपदेश ऐकिला. गुरुविरहानें दुःखित झालेल्या साधूंनीं तीन दिवसाचें उपोषण केलें.

सूरीश्वराचा मानवी देह नष्ट झाला पण कीर्तिरूपानें ते अजरामर झाले आहेत.

## १४

सूरीश्वराच्या मृत्यूसबधीं एका चमत्काराचें वर्णन त्याच्या समकालीन कवी(ऋषभदास)कडून करण्यात आलें आहे. सूरीश्वर ज्या दिवशीं निर्वाण पावले त्या दिवशीं रात्रीं अग्निसंस्कार जेथें झाला त्या स्थळीं नाटक व नृत्याचा कार्यक्रम होत असलेला एका नागर वाण्यानें पाहिला. ही हकीगत गावातील लोकाना कळाली. दुसऱ्या दिवशीं सकाळीं बरेच लोक त्या बगीच्याकडे गेले. तेथें त्याना नाटारंगासारखें कांहीं दृष्टीस पडलें नाहीं. पण वाझ आंब्याच्या झाडांना लहान लहान कैऱ्या, पाड आणि पिकलेले आंबे लागलेले दिसले. ज्या झाडाना मोहर फुटत नव्हता त्याना भाद्रपद महिन्यात आंबे लागावे ही मोटी नावीन्यपूर्ण आणि आश्चर्यकारक घटना होती. पुन्हा एका जैन कवीनेंच ह्या घटनेचें वर्णन केलें आहे असें नसून कांहीं मुसलमान लेखकाकडून याबद्दल उल्लेख करण्यात येतो.

पुष्कळ भाविक जैनाचा या गोष्टीवर विश्वास असेल. उलटपक्षीं या प्रसंगाची बुवाबाजीच्या सौम्य प्रकारात बुद्धिवादी गणना करतील. तें कांहीं असो, एक गोष्ट मात्र सत्य आहे: ह्या प्रसंगावरून जैन आणि जैनेतर जनतेंत सूरीश्वर किती प्रिय होते हें निदर्शनास येतें.

सूरीश्वरांच्या स्वर्गवासामुळें अकबर व अब्दुल फजल याना फार वाईट वाटलें. लाहोरहून सूरीश्वराना भेटण्याकरिता निघालेल्या विजयसेनसूरींना सूरीश्वराच्या स्वर्गवासाची दुःखद वार्ता ते पाटणमध्यें आल्यावर कळली. त्या वेळीं त्याना जबर धक्का बसला. वाचा बंद झाली आणि ते मूर्छित होऊन जमिनीवर पडले. थोड्या वेळानें ते शुद्धीवर आले. पण मन फार अस्वस्थ आणि कष्टी झालें होतें. अन्न गोड लागेना. त्यांच्या मनामध्यें वारंवार विचार येत. आता मी कोणास वंदन करूं? जिनशासनाचें कसें होईल? अशा रीतीनें विजयसेनसूरि हताश झाले होते. सूरीश्वर हयात होते तोंपर्यंत विशेष जबाबदारी विजयसेनसूरींवर पडली नव्हती. आता सबंद बोजा त्यांच्यावर येऊन पडला. पण त्या धीरपुरुषानें आपल्या गुरुप्रमाणें जिनशासनाची सेवा केली आहे.

## १५

'ह्या गच्छामध्यें सुंदर असे हीरविजयसूरि आहेत कीं ज्याना भट्टारक-पणाचा मान मिळाला आहे. ते दोन हजार निर्ग्रन्थ साधुना शिक्षण देतात आणि आपल्या हृदयरुचिर, हितकर आणि जिनवाणीप्रमाणें गोड भाषणानें त्यांचें चारित्र्य घडवितात .. ज्या ज्या देशात आणि शहरात या साधूनें विहार केला तेथें तेथें श्रीमंतानीं सात क्षेत्रामध्यें धनाचा व्यय केला आणि जीवदया, मतप्रवर्तण आणि दीनाचा उद्धार अशीं कार्यें करविलीं....हे असे साधु आहेत कीं संयम हेंच त्यांचें धन आहे. स्वकीय आणि परकीय या भेदभावापासून ते पर असून मित्र आणि शत्रु, दगड आणि रत्न व स्त्री आणि गवत याबर त्यांची समदृष्टि असते.' —पद्मसागर.

जगद्गुरु काव्याचे कर्ते पद्मसागर यांच्याप्रमाणें कित्येक कवींनीं सूरीश्वरा-वर स्तुतिसुमनें वाहिलीं असतील. जगद्गुरु हे मोठे युगप्रधान साधु झाले आहेत. त्यांचा शिष्यवृंद फार मोठा होता. तो जितका संख्येनें मोठा होता तितका प्रभावशालीही होता. संस्कृत आणि गुजराती साहित्यामध्यें त्यांनीं मरीव कामगिरी केली आहे. या शिष्यांपैकीं कित्येकाना सूरीश्वरांकडून स्फूर्ति मिळाली आहे

सूरीश्वर आदर्श जैनसाधु म्हणून प्रसिद्ध आहेत. कित्येक साधु मान्य

करण्यात कुशल असतात. व्याकरणामध्यें कित्येक हुशार असतात. अक्षर-शास्त्र आणि ज्योतिष जाणणाऱ्यांची संख्या कांहीं कमी नसते. पण चारित्र्य हेंच ज्यांच्या विलासाचें वसतिस्थान असतें असे सूरीश्वरासारखे साधु सापडणें कठीण. आगमाच्या प्रत्येक ओळीवर त्यांची श्रद्धा होती. वीत-रागाचे ते कट्टे उपासक होते. स्वतःची जीवनबाग फुलविणारे ते एक कुशल माळी होते. मोहविकाररूपी जनावराकडून आपल्या जीवनबागेचा विध्वंस होऊं नये म्हणून वैराग्यदंड घेऊन ते सज्ज झाले. आपल्या बागेंतील द्वेषमत्सररूपी दगडांना फेकून देऊन त्यांनीं तेथें प्रेमाचे वृक्ष वाढविले आणि त्या वृक्षावर शांतीचे वेल चढविले. या बागेमध्यें जिन-भक्तीचे आणि सम्यक्त्वाचे सुंदर ताटवे ठिकठिकाणीं लावले. या बागेमध्यें उत्पन्न होणारी घाण उपवासरूपी अग्नीमध्यें वारंवार जाळून टाकली. स्वतःची बाग ते फुलवीत बसले नाहींत तर कित्येकांच्या जीवनबागा त्यांनीं फुलविल्या. त्यांनीं हे सर्व कष्ट कां केले ? साधा माळी आपल्या बागेची जोपासना करतो फुलाफळांसाठीं, हौशी असला तर सौंदर्याच्या वाढीसाठीं. सूरीश्वरांनीं जीवनबागा फुलविल्या केवळ सिद्धशिलेसाठीं.

साधे साधु असतांना ते आदर्श शिष्य होते, आणि आदर्श शिष्यानंतर ते आदर्श गुरु झाले. साधूचे पंचमहाव्रतांचें कडक पालन त्यांनीं केलें. त्या व्रतांचे बारीकसारीक नियम त्यांनीं पाळले. संन्यास घेतल्यानंतर स्वाद ही काय वस्तु आहे हें त्यांना ठाऊक नव्हतें.* इतर मानवाप्रमाणें खाण्यासाठीं ते जगत नव्हते; जगण्यासाठीं ते खात होते. आणि कर्मक्षय करून आत्म्याचा उद्धार करण्यासाठीं ते जगत होते. स्वतःसाठीं निर्माण केलेल्या कोणत्याही वस्तूचा‡ ते उपयोग करीत नसत. आणि अशा प्रकारें सूक्ष्म गोष्टींकडे लक्ष

* एकदा सूरीश्वराच्या वाट्यास खारट खिचडी आली. त्यांनीं तोंड वेडेंवाकडें न करतां तिचें सेवन केलें. ज्या गृहस्थाच्या घरून ही खिचडी गोचरीमध्यें आली होती तो उपाश्रयांत आला व सूरीश्वराच्या शिष्यास म्हणाला, 'आमची खिचडी फार खारट झाली आहे. ती आपण खाऊं नये. म्हणून मी मुद्दाम पळत आलों आहें.' हा गृहस्थ येण्याचे अगोदर सूरीश्वराचें जेवण झालें होतें

‡ अमदावादमध्यें असतांना एक भव्य आसन सूरीश्वरांसाठीं तयार करण्यात आलें होतें त्यावर ते कधीं बसले नाहींत.

ठेवून कडक आचार पाळण्यात ते कसूर करीत नसत. या नश्वर शरीरावर त्यांनीं कधीं मोह ठेवला नाहीं. वयाच्या साठाव्या वर्षी त्यांनीं फत्तेपूरसिक्रीहून गुजरातकडे विहार केला. वेळोवेळीं ज्या शारीरिक पीडा त्यांना होत त्यांनीं ते कधीं वैतागून गेले नाहींत तर समभावपूर्वक सर्व दुःखें त्यांनीं सहन केलीं. गुरुच्या आज्ञेप्रमाणें ते वागत आणि स्वतः गुरु झाल्यानंतर शिष्यांवरहि ते प्रेम करीत.*

अकबराचें मन अहिंसाधर्माकडे वळविण्यात त्यांनीं जें यश मिळविलें त्यामुळें ते आज इतके प्रसिद्धि पावले आहेत. श्रीहेमचंद्राचार्याप्रमाणें ते मोठे व्याकरणकार नव्हते अथवा सिद्धसेन दिवाकराप्रमाणें प्रखर कवि नव्हते. या दोघांच्या मानानें त्यांची ग्रंथसंख्या फारच लहान होती. तरी पण या दोन साधूंप्रमाणें ते विद्वान् होते हें खास. त्यांची विद्वत्ता मोजण्याचें माप त्यांची ग्रंथसंख्या हें नसून त्यांनीं मोठमोठ्या लोकांवर पाडलेला

* गुरुविषयीं सूरीश्वराच्या मनांत नितान्त आदर होता. एकदां त्यांच्या गुरूंनीं त्यांना भेटण्यासाठीं लवकर बोलाविलें. सूरीश्वरांनीं दोन दिवसांचा उपवास केलेला होता तरीपण पारण्याच्याच दिवशीं अन्नसेवन करण्याच्या अगोदरच त्यांनीं गुरूंचा मुक्काम असलेल्या गांवीं प्रयाण केलें. श्रावकांनीं त्यांना फार विनविलें. पण त्या विनवण्यांचा उपयोग झाला नाहीं.

गुरुपेक्षा शिष्य सवाई अशा अर्थाचा किताब अकबरानें सूरीश्वराच्या पट्टशिष्यास-विजयसेनसूरीस- दिला ही बातमी सूरीश्वरांना समजताच त्यांना गहिंवरून आलें. आपल्यापेक्षां आपला शिष्य सवाई निघावा अशीच कोणत्याही प्रेमळ गुरूची इच्छा असणार. सूरीश्वराच्या गुणग्राहकतेचीं काहीं उदाहरणें सांगण्यात येतात. अमरविजय नांवाचे त्यांचे एक शिष्य होते. निर्दोष आहार घेण्याच्या बाबतींत त्यांचा फार कटाक्ष होता. त्यांना तसा आहार मिळाला नाहीं तर ते चार चार दिवसांचे उपवास करीत. या साधूच्या हातानें आहार घेतल्यानंतर सूरीश्वरांना फार आनंद होत असे. गुणी पुरुषाबद्दल त्यांच्या मनात किती प्रेम होतें हें यावरून सिद्ध होतें. सूरीश्वराच्या विहारामध्यें त्यांनीं अकबराच्या दरबारी केलेल्या कार्याबद्दल त्यांची वारंवार प्रशंसा होई. आणि वस्तुतः त्यात बराच सत्यांश होता. पण निरभिमानी सूरीश्वर विजयसेनसूरि, शांतिचंद्र आणि भानुसिंह यांच्या कार्याची प्रशंसा करीत आणि अकबराच्या मोठेपणाशिवाय हें कार्य अशक्य होतें असें स्पष्ट सांगत असत.

प्रमाद हें आहे. अकबरास अहिंसक बनविणे, लष्टरी सुभेदाराना आपल्या बाजूला वळविणें हीं कार्ये लहान आहेत का? दिवाकराची स्तुति आणि सिद्धहेम व्याकरणाप्रमाणें सूरीश्वरानीं अकबराकडून करवून घेतलेल्या 'अमारी घोषणा' जैनाच्या इतिहासात अमर राहतील.

जैनाचा इतिहास म्हणजे नररत्नाच्या खाणीचा इतिहास. या संपन्न, खाणींतून कित्येक रत्नें बाहेर पडलीं असतील, आणि पुढें पडतील. त्याच्या स्तुतिपर केलेलीं काव्यें कोणी गात नसतील; मत्सरी इतिहासकारानीं त्याना उजेडात आणलें नसेल; पण त्यामुळें त्याचें व्यक्तित्व नाहींसें होत नाहीं. त्याच्या कार्यावर बोळा फिरविला जात नाहीं. त्यानीं हिंदुस्थानचा इतिहास काहीं प्रमाणात घडविला आहे; आर्योच्या तत्त्वज्ञानात मौलिक भर टाकली आहे हे निःसशय. जैन राजे, जैन मंत्री, जैन साहित्यिक अथवा जैन व्यापाऱ्यापेक्षा जैनाच्या संतवर्गाकडून हें कार्य प्रामुख्यानें झालें आहे आणि या जैनसतामध्यें सूरीश्वराचें स्थान मोठें आहे.

त्याचा जन्म ओसवाल कुलामध्यें झाला पण आज ते फक्त ओसवाल समाजाचे राहिले नाहींत. तपागच्छाचे ते आचार्य होते. मूर्तिपूजा मानणारे ते होते. दिगंबराचा आणि त्याचा काहींही संबंध नव्हता. इतकें असूनही अखिल जैन जनतेचे ते आज भूषण होऊन बसले आहेत. सद्धर्माची शिकवण दिल्यामुळें कित्येक आर्येतरावर त्याचें ऋण आहे. त्याच्यावर आपला हक्क प्रस्थापित करणारा वर्ग मानवसमाजापेक्षाही मोठा आहे. पाण्यातील मासे, पाजरपोळामधील पशु आणि पिंजऱ्यातील पक्षी या सर्वांना सूरीश्वर प्रिय होऊन बसले आहेत. आपणास परिचित नसलेल्या भाषेंत ते त्याचें स्तुतिगान गात आहेत! मानवाच्या मगरमिठींतून सुटका करण्यासाठीं अनेक सूरीश्वर पृथ्वीतलावर उत्पन्न होवोत अशी ते मूकप्रार्थना करीत आहेत!

## परिशिष्ट १

## बादशाह अकबराचें फर्मान १ लें

### अल्ला हु अकबर

१ जलालुद्दीन महंमद अकबर बादशहा गाजीचें फर्मान. महान् राज्यास मदत करणार, उत्तम स्वभावी आणि गुणवान्, उत्कृष्ट खानाचे नमुन्यासमान अशा मुबारिज्जुद्दीन (धर्मवीर) आझमखानानें जाणावें—

निरनिराळे रीतभातवाले, भिन्न धर्मवाले, विशेष मतवाले आणि भिन्न पथवाले, सभ्य अथवा असभ्य, लहान किंवा मोठे, राजा अथवा रंक ज्ञानी किंवा अज्ञानी अशा सर्व लोकांनीं—ज्याच्यावर परमेश्वराची कृपा होण्याचा समय आहे. आपली नित्य क्रिया करीत असताना आणि आम्हांस दीर्घ आयुष्य मिळण्यासाठीं आणि सत्कृत्य करण्यास प्रेरणा मिळण्यासाठीं ईश्वराची प्रार्थना करावी. कारण मनुष्यजातीमधून एकास राजपदावर चढविण्याचा आणि सरदारी पेहरवेष अर्पण करण्यात शहाणपणा हा आहे कीं त्या राजानें पोटात दया ठेवून लोकांशीं मित्रता जरी ठेवता आली नाहीं तरी त्याच्याशीं प्रेमानें वागावें आणि ईश्वरानें उत्पन्न केलेल्या प्राणिवर्गावर दया ठेवावी.

यावरून योगाभ्यास करणाऱ्यामध्यें श्रेष्ठ असे हीरविजयसूरि सेवडा आणि त्याचे धर्म पाळणारे शिष्य, ज्याना आमच्या दरबारामध्यें हजर राहण्याचा मान मिळाला आहे आणि जे आमच्या दरबाराचे हितेच्छु आहेत, त्यांच्या योगाभ्यासाचा खरेपणा आणि परमेश्वरशोधाविषयीं त्यांची नजर पाहून हुकूम केला आहे कीं ह्या शहराच्या रहिवासियांनीं त्याना अडचण करू नये, त्यांच्या मंदिरात अथवा उपाश्रयात उतारा देऊ नये, त्यांचा तिरस्कार करू नये आणि त्यांच्या (मंदिराचा अथवा उपाश्रयाचा) काहीं भाग पडला असल्यास कोणत्याही अज्ञानीनें अथवा धर्मान्धानें त्याना मानणाऱ्यास अथवा त्यांचा पाया टाकणाऱ्यास अडथळा करू नये आणि पाऊस न पडणें ही गोष्ट ईश्वराच्या अधिकारातील आहे ती त्याच्यासारख्या ईश्वरास मानणाऱ्यावर लादतात आणि त्याना अनेक प्रकारचे कष्ट देतात अशी गोष्ट यापुढें होऊ नये. आणखी असें पण देव-

## परिशिष्ट १

# बादशाह अकबराचें फर्मान १ लें

### अल्ला हु अकबर

' जलालुद्दीन महंमद अकबर बादशहा गाजीचें फर्मान महान् राज्य मदत करणार, उत्तम स्वभावी आणि गुणवान्, उत्कृष्ट स्थानाचे नमुनेसमान अशा मुबारिजुद्दीन (धर्मवीर) आझमखानानें जाणावें—

निरनिराळे रीतभातवाले, भिन्न धर्मवाले, विशेष मतवाले आणि भि पथवाले, सभ्य अथवा असभ्य, लहान किंवा मोठे, राजा अथवा र ज्ञानी किंवा अज्ञानी अशा सर्व लोकांनी—ज्यांच्यावर परमेश्वराची कृ होण्याचा समय आहे. आपली नित्य क्रिया करीत असताना आ आम्हास दीर्घ आयुष्य मिळण्यासाठीं आणि सत्कृत्य करण्यास प्रेरण मिळण्यासाठीं ईश्वराची प्रार्थना करावी. कारण मनुष्यजातीमधून एका राजपदावर चढविण्याचा आणि सरदारी पेहरवेष अर्पण करण्यात शहाण पणा हा आहे की त्या राजानें पोटात दया ठेवून लोकांशीं मित्रता जर ठेवता आली नाहीं तरी त्याच्याशीं प्रेमानें वागावें आणि ईश्वरानें उत्प केलेल्या प्राणिवर्गावर दया ठेवावी.

यावरून योगाभ्यास करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ असे हीरविजयसूरि सेवड आणि त्यांचे धर्म पाळणारे शिष्य, ज्यांना आमच्या दरबारामध्यें हजर राहण्याचा मान मिळाला आहे आणि जे आमच्या दरबाराचे हितेच्छु आहेत, त्यांच्या योगाभ्यासाचा खरेपणा आणि परमेश्वरशोधाविषयीं त्यांची नजर पाहून हुकूम केला आहे की ह्या शहराच्या रहिवाशांनी त्यांना अडचण करूं नये, त्यांच्या मंदिरांत अथवा उपाश्रयांत उतारा देऊं नये, त्यांचा तिरस्कार करूं नये आणि त्यांच्या (मंदिरांचा अथवा उपाश्रयाचा) कांहीं भाग पडला असल्यास कोणत्याही अज्ञानीनें अथवा धर्मांधानें त्यांना मानणाऱ्यास अथवा त्यांचा पाया टाकणाऱ्यास अडथळा करूं नये आणि पाऊस न पाडणें ही गोष्ट ईश्वराच्या अधिकारांतील आहे की त्यांच्यासारख्या ईश्वरास मानणाऱ्यांवर लादतात आणि त्यांना अनेक प्रकारचे कष्ट देतात अशी गोष्ट यापुढें होऊं नये. आणखी असें पण देख-

ण्यात येतें कीं हाजी हबीबुल्लाह जे आमची सत्याच्या शोधासंबंधीं आणि ईश्वराच्या ओळखीसंबंधीं जाणतात, त्यानीं याना (सूरीश्वराना) इजा केली आहे. यामुळें आमच्या पवित्र मनास, कीं जें जगाचा बंदोबस्त करणारें आहे, फार वाईट वाटतें म्हणून आपण आपल्या राज्यात खबरदारी घ्यावी कीं कोणीं कोणावर जुलूम करणार नाहीं. त्या बाजूचे हल्लींचे आणि भविष्यकाळचे हाकिम, नवाब आणि राज्याचा सबंध अथवा काहीं भागाचा कारभार पाहणाऱ्या मुत्सद्याचा हा नियम असावा कीं राजाचा हुकूम जो परमेश्वराच्या हुकूमाचें रूपान्तर आहे— त्यानीं त्या हुकूमाच्या विरुद्ध जाऊ नये. हें फर्मान वाचून याची नक्कल टेवावी, ज्यामुळें ती कायमची सनद होऊन बसेल. इत्यादि सन ३५ चे अझार महिन्याच्या सहाव्या तारखेचा खुरदाद नावाचा दिवस. मुताबिक २८ माहे मुहरम सन ९९९ हिजरी.

## परिशिष्ट २

# बादशाह अकबराचें फर्मान २ रें

### अल्ला हु अकबर

अबु अल मुजफर सुल्तान ...... चा हुकूम उच्च दर्जाच्या निशानीची नक्कल अस्सलप्रमाणें.

या वेळीं उच्च दर्जाच्या निशाणीला बादशहाच्या मेहेरबानीचा सन्मान प्राप्त झाला कीं सध्याचे आणि भाविष्याचे राज्याधिकारी, जहागीरदार, कोट्यधीश, गुजरातच्या सुभ्यावरील आणि सौराष्ट्र सरकारच्या मुत्सद्यानीं सेवडा लोकानजीक गाय, बैल, म्हैस, रेडा मारण्याच्या आणि चामडें उतरविण्याच्या मनाईबाबत श्रेष्ठ आणि सुखाच्या चिन्हाकित फर्मान आहे. त्या श्रेष्ठ फर्मानात मागील बाजूस लिहिलें आहे कीं—'प्रत्येक महिन्यातील काहीं विवक्षित दिवस तें (मास) खाण्याची इच्छा करू नये. तें कर्तव्य आणि उचित मानावें. त्याचप्रमाणें ज्या प्राण्यानीं घरात किंवा झाडावर घरटीं बांधलीं असतील त्याची शिकार करण्यापासून त्याना पिंज-
[illegible] पूर्ण काळजी घ्यावी.’

त्या माननीय फर्मानात लिहिलेले आहे कीं— 'योगाभ्यासींमध्यें श्रेष्ठ हीरविजयसूरींचे शिष्य विजयसेनसूरि मेवडा आणि त्याचा धर्म पाळणारे कीं त्याना आमच्या दरबारात हजर राहण्याचा मान मिळाला आहे आणि जे आमच्या दरबारचे खास हितचिंतक आहेत त्याच्या योगाभ्यासाची सत्यता, विशेषता आणि परमेश्वराच्या सशोधनाकडे दृष्टि देउन (हुकूम झाला) कीं त्याच्या देवालयात वा उपाश्रयात कोणीही मुकाम करू नये. त्याना तिरस्कारू नये. तीं जीर्ण झालीं असतील आणि त्याम मानणारा, चाहाणारा किंवा दानधर्म करणारा यापैकीं कोणी जर त्याची दुरुस्ती करतील किंवा त्याचा पाया घालतील तर अर्धदग्ध ज्ञानी अथवा धर्मांध असणाऱ्यानें त्याना अटकाव करू नये. आणि त्याप्रमाणें परमेश्वराला न ओळखणारे पाऊस अडविणें आणि याप्रमाणें अन्य कामें कीं जीं पूजनीय जातींचीं (ईश्वराचीं) कामें आहेत त्याचा आरोप मूर्खपणा आणि वेवकूबीमुळें इद्वगाल समजून त्या बिचाऱ्या परमेश्वरास मानणाऱ्या वर ठेवितात आणि त्याना नानाप्रकारें त्रास देतात. त्याचप्रमाणें ते त्या धर्मक्रिया आचरतात त्यामध्यें विघ्नें आणतात. अशा कृत्याचा आरोप ह्या बिचाऱ्यावर न ठेविता त्याना आपल्या स्थानीं सुखानें भक्ति करू द्यावी. त्याचप्रमाणें धर्मक्रियाही करू द्याव्यात.'

त्यामुळें (त्या) श्रेष्ठ फर्मानाबरहुकूम अमल करुन अशी ताकीद दिली पाहिजे कीं ह्या फर्मानाची सक्त अमलबजावणी व्हावी. त्याविरुद्ध कोणीही हुकूम करू नये. स्वत चें कर्तव्य जाणून ह्या फर्मानाची हेळसाड करू नये ता. १ शहर्युर महिना इलाही सन ४६ मुवाफिक ता. २५ महिना सफर १०१० हिजरी.

## पेक्याचें वर्णन

फरवरदीन महिना ज्या दिवसात सूर्य एका राशींतून दुसऱ्या राशींत संक्रमण करतो. ते दिवस ईद, मेहरचा दिवस, प्रत्येक महिन्यातील रविवार, ते दिवस कीं जे दोन सुफियाच्या मध्यें येतात, रजब महिन्यातील सोमवार, आबान महिना कीं जो बादशहाच्या जन्माचा महिना आहे. प्रत्येक शमशी महिन्याचा पहिला दिवस, ज्याचें नाव ओर्मज्द आहे. आणि

चारा पवित्र दिवस की जे श्रावण महिन्यातील शेवटचे सहा आणि भाद्रपद महिन्याचे प्रथमचे सहा मिळून होतात. (पर्युषण)

नशाने आलिशानची नकल अस्सलबरहुकूम.

## शिका

ह्या शिक्यात फक्त खान महम्मुदचें नाव वाचलें जातें.

## शिका

ह्या शिक्यात अक्बरशाह मुरीरजादा दाराब असें लिहिलेलें आहे.

---

## वरील दोन सनदांशिवाय

१ इलाही सन ३५ अझार महिना ६ तारीख खुरदाद २८ मोहरम ९९९ हिजरी.

२ शहर्युर महिना इलाही सन ४६ महिना सफर १०१० हिजरी.

३ फरवरदीन सन ५.

४ शहेरीवर महिना सने इलाही ५५.

५ १९ शहाबान १०२७.

६ ता. २१ अमरदाद इलाही वर्ष १० रजबुल मुरज्जब हिजरी सन १०२४ १७ वी तारीख गुरुवार.

ह्या जहागीर शहाजहानादींच्या सनदांच्या मूळ नक्लाचे अनुवाद व अस्सल फर्मानें मिळण्यासारखीं असूनही केवळ विस्तारभयानें दिलीं नाहींत. पोर्तुगीज पाद्री पिनहरोच्या दोन्ही पत्राचे इंग्रजी अनुवाद सुप्रसिद्ध पाश्चात्य इतिहासकार विन्सेंट स्मिथ यांनी स्वतः श्रीविजयधर्मसूरि यांना पाठविले होते.

---

# भगवान् पार्श्वनाथ

## १

फार प्राचीन काळापासून भरतभू ही उच्च संस्काराची खाण म्हणून सुप्रसिद्ध आहे कारण जगाला तिनें अनेक मौल्यवान् रत्नें दिलीं आहेत. दीन आणि दुःखी प्राण्यांनाच नव्हे तर रंकापासून रावापर्यंत सर्वांना सुख-समाधानानें रहाता येईल, ऐहिक व पारलौकिक कर्तव्यें पार पाडता येतील, असें आत्मसंस्कृतीचें दिव्य तत्त्वज्ञान जगाला देणाऱ्या महापुरुषांचें भरत वर्ष हें जन्मस्थान आहे

जीवमात्राच्या आर्तनादानें ह्या विभूतींचें चित्त द्रवलें, आणि म्हणून कौटुंबिक स्वार्थ सोडून विश्वकुटुंबाशीं ते एकरूप झाले त्यांनीं अमोघ ज्ञान भांडार उघडून जगाला इष्ट वळण दिलें. स्वानुभवानें प्राप्त केलेल्या अमर ज्ञानाची ज्योत तेवत ठेवून जनतेला सत्य, अहिंसा, प्रेम, त्याग, सेवा आणि समतेचे पाठ दिले. अशा प्रकारें त्यांनीं जगाला विश्वबंधुत्वाचें उच्च कौटुंबिक जीवन शिकविलें विश्वबंधुत्वाचा हा उज्ज्वल प्रवाह हिंसक वृत्तीच्या वणव्यांतून, ईर्षा द्वेषाच्या वावटळींतून आणि विषमतेच्या विस्तीर्ण दरींतून त्यांनीं अविरतपणें वाहविला 'जगा आणि जगू द्या'च्या गुंजारवानें सारें जग प्रमोदित केलें

प्राणिमात्राचें कल्याण साधणारें तत्त्वज्ञान म्हणजेच धर्म. जगाचें पालन-पोषण आणि विकास करणारी ही दिव्य औषधि आहे कालान्तरानें इन्द्रिय लोलुपतेमुळें जेव्हां ह्या तत्त्वांत स्वार्थाची विकृति शिरते त्या वेळीं उज्ज्वल अशा धर्मतत्त्वाला खग्रास ग्रहण लागतें इतकेंच नव्हे तर मूलधर्मतत्त्वाला बाजूला सारून त्याची विकृति हाच धर्म होऊन बसतो. अशा वेळीं जगाची शांतता डळमळते, लुप्त होऊं पहाणाऱ्या सत्यांतूनच महापुरुषांच्या रूपानें दिव्य शक्ति प्रकट होते.

याप्रमाणें इ. स. पूर्वीच्या ८व्या शतकांत परिस्थिति निर्माण झाली होती. श्रमविभागणीच्या हितकारी तत्त्वावर आरूढ झालेला वर्णाश्रमधर्म

उचनीचतेच्या भावनेला वळी पडला गेला. आणि त्यातूनच विषमतेची विषारी वेल फोफावली. त्यामुळें चराचरसृष्टींत व्यापलेलें परमेश्वराचें स्वरूप शूद्राच्या आणि निरपराध प्राण्याच्या बाबतींत मारक बनलें. स्त्रीला मोक्षासाठीं अनधिकारी ठरवून विलासाचें साधन बनविण्यात आलें. सार्वजनिक आणि वैयक्तिक सुखशातीसाठीं गरीब बिचाऱ्या रेड्याला महिषासुर बनवून त्याचा बलि देण्याची अघोरी प्रवृत्ति निर्माण केली गेली. सर्वत्र रक्ताचे पाट वाहू लागले. अशा प्रकारच्या हिंसाकांडामुळें देशातील पशुधनाला ओहोटी लागली व यज्ञयागादि कर्मकांडाचें स्तोम अवास्तव माजलें.

अशा प्रकारें आत्मविकासाचें तेजस्वी तत्त्व क्रियाकांडाच्या अतिरेकाच्या दडपणाखालीं दडपले गेले म्हणून हिंसक वृत्ति आणि विषयलोलुपतापोषक क्रियाकांडाचें जाळें धर्माच्या नावावर विणलें जाऊन त्यात जनसमूह माशाप्रमाणे आकर्षिला गेला: बाह्य तप आणि चमत्काराचें अत्यंत प्रस्थ माजलें.

अशा परिस्थितींत इ. स. पूर्वी ८७७ त अेक महान् विभूति निर्माण झाली. तिनें आपल्या अलौकिक ज्ञानानें ह्या सर्व अधार्मिक आणि अहितकर अशा अज्ञानी क्रियाकांडावर झगझगीत प्रकाश पाडून जनतेला पुन्हा सत्य आणि अहिंसेच्या मार्गाकडे प्रवृत्त केलें. आज जवळ जवळ तीन हजार वर्षे होत आलीं परंतु त्याचें नाव आणि त्याची शिकवण जनतेच्या अंत करणात जशीच्या तशीच स्थिर आहे. ती विभूति म्हणजेच भगवान् पार्श्वनाथ होय.

इ.स पूर्वी ८७७ वें तें वर्ष होतें. हिमालयाच्या मानसकन्येनें पवित्र केलेल्या वाराणसी नगरींत सुप्रसिद्ध ईक्ष्वाकुवंशीय अश्वसेन नावाचा राजा राज्य करीत होता तो न्यायी, पराक्रमी व प्रजेचें हित करण्यात तत्पर असे. वामादेवी नामक त्याची सुशील व सुस्वरूप स्त्री होती. 'शुद्ध बीजापोटीं फळे रसाळ गोमटीं' हा निसर्गनियमच आहे. ह्या राणीला एके दिवशीं अद्भुत स्वप्न पडलें. त्यात मंगलसूचक अशा चौदा वस्तु तिला दिसल्या.* एक शुभ्र

* चैत्र वद्य ४ ला मध्य रात्रीं प्राणत देवलोकातून वामादेवीच्या गर्भांत एक भाग्यवान् जीवाचें आगमन झालें पूर्वजन्माच्या तीर्थंकर नामकर्माच्या विशुद्धतेमुळें मति, श्रुत आणि अवधि ह्या तीन ज्ञानानीं तो परिपूर्ण होता.

वर्णाचा सुंदर हत्ती आकाशातून खालीं उतरून आपल्या मुखात प्रवेश करीत असल्याचें पाहून ती जागी झाली. असलें मंगलकारी स्वप्न पाहून तिला आनंद झाला. सुशिक्षित आणि सुसंस्कृत असल्याकारणानें त्रिभुवनीं झेंडा फडकविणारें बालक आपल्या पोटीं येईल असें तिला वाटू लागलें. नऊ मास पूर्ण झाल्यावर पौष वद्य १० ला विशाखा नक्षत्रात एका सुलक्षणी पुत्राला तिनें जन्म दिला.* तें तेजस्वी व गोजिरवाणें बालस्वरूप पाहून मातापित्याचा हर्ष गगनात मावेना. नामांकित ज्योतिर्विदांच्या संमतीनें मुलाचें पार्श्वकुमार असें नाव ठेवलें.

प्राचीन काळीं राजा प्रजेच्या सुखदुःखाशीं समरस होत असल्यानें राजाच्या सुखात प्रजाही वाटेकरी होई. त्यामुळें राज्यात चोहोंकडे आनंदी आनंद पसरला. राजानें बंदीजन मुक्त केले. याचकांना दानें वाटलीं. प्रजेनें गुढ्या तोरणें उभारून नगर सुशोभित केलें आणि मोठा उत्सव केला. प्रतिदिनीं राजकुमार चंद्राच्या कलेप्रमाणें वाढत होता. जन्मतः असलेले त्याचे गुण हळू हळू प्रकट होत चालले. बालसुलभ सौजन्यानें व प्रेमळपणानें तो सर्वांचा आवडता झाला. वामादेवीला तर त्याला कोठे ठेवू आणि कोठें नको असें झालें असल्यास त्यात नवल कसलें? युवराजाला अनुरूप असा प्रकारचें शिक्षण देण्यात आलें. त्यात आपल्या शौर्यानें आणि कुशाग्र बुद्धीनें त्यानें नाव कमावलें. सर्व प्रकारच्या शिक्षणात पारंगत होऊनही कुमार असंतुष्ट होता व तो पुष्कळ वेळा एकटाच कमल्यातरी चिंतनात तासन् तास निमग्न होई. अशा वेळीं त्याच्या चेहऱ्यावर अपूर्व तेज दिसत असे. कारण ती चिंता मनाला पीडा देणारी व्याधि नसून आत्म्यास उन्नत करणारी तन्मयता होती.

## २

कालचक्र वेगानें फिरत होतें. बाल्यावस्था संपून कुमारानें तारुण्यावस्थेत पदार्पण केलें. राजकार्याची धुरा आपल्या खांद्यावर घेण्यास तो

* इंद्रादि देवांनी त्याचा जन्मोत्सव अत्यंत थाटानें उजविल्याचा प्राचीन ग्रंथात [illegible]

समर्थ बनला. कुमाराच्या पराक्रमाची यशोगाथा सर्वत्र पसरली. परंतु पित्याच्या प्रेमळ नजरेला तो अजून बालकच दिसत होता.

एकदा पार्श्वकुमार आपल्या महालात आत्मचिंतनात निमग्न असता अचानक रणभेरीचा नाद त्याच्या कानीं पडला. तद्रीभंग होऊन कुमार एकदम चमकले आणि पित्याच्या निवासाकडे गेले. पित्याच्या चरणीं त्यांनीं मस्तक ठेवताच शतायु होण्याचा आशीर्वाद देऊन राजा अश्वसेनानें वत्सलतेनें त्याच्या पाठीवरून हात फिरविला.

'ही रणभेरी कसली, पिताजी ?' कुमारानीं प्रश्न केला.

'कुशस्थलीकडे प्रयाण करतों आहोत आम्ही, कुमार ?' राजा अश्वसेन चिलखत चढवीत बोलला.

'इतक्या घाईनें ?' कुमारानीं जिज्ञासेनें विचारलें.

'कर्तव्यपालनासाठीं इतकी घाई जरूरीचीच आहे.' राजा बोलला.

'मग आपण स्वतःच कशाला जावयाला पाहिजे ? मी स्वारीवर जातों.' कुमार उत्तरले.

'नाहीं बाळ. राजकन्येची इभ्रत राखण्यासाठीं मला स्वतःलाच गेलें पाहिजे.' अश्वसेनानें कारण दाखविलें.

'पण पिताजी, मी असताना आपणास रणसंग्रामाची चिंता का ? आपण मला आज्ञा द्या. आपल्या आशीर्वादानें मी विजयी होऊनच येईन.' कुमार निश्चयानें बोलले.

'बेटा, तू लहान आहेस. कलिंग देशाच्या यवनराजाशीं हा सामना आहे. कुशस्थलीच्या राजकन्येचें हरण करण्यासाठीं यवनराज चालून गेला आहे. कुशस्थली नगराला वेढून त्यानें त्याचा बाह्य जगाशीं असलेला संबंध तोडून टाकला आहे. मोठ्या शिकस्तीनें त्यातून निसटून मंत्रिपुत्रानें कुशस्थलीनरेश प्रसेनजित याचा निरोप आणला आहे. राजकन्या आणि राजघराण्याची अब्रू वाचविण्यासाठीं त्यानें मदतीची याचना केली असता त्याच्या हाकेला ओ देऊन जुलमानें राजकन्येशीं लग्न लावू पहाणाऱ्या कलिंगाधिपतीला शासन करण्यास आपण गेलेंच पाहिजे.' राजानें खुलासा केला.

'असें ! मग तर ह्या स्वारीवर जाण्यास मीच योग्य आहें. पिताजी, आपण आज्ञा द्या. प्रत्येक पिता आपल्या पुत्राला लहानच समजतो. परंतु छोटासा केसरी प्रचंड हत्तीचें गंडस्थळ नाहीं का फोडीत ?' राजकुमार बाणेदारपणानें बोलले

पार्श्वकुमाराचा निश्चय पाहून राजा विचारात पडला.

'माझ्या शौर्याविषयीं आपणास शंका तर वाटत नाहीं ना ?' कुमारानीं विचारलें.

'छे छे, बेटा. त्यात कसली शंका ? तुझा पराक्रम सर्वत्र गाजत असता कोण बरें शंका घेईल ? जा आनंदानं जा आणि विजयी हो. माझा तुला आशीर्वाद आहे ' अश्वसेनानें कुमारास परवानगी दिली.

वडिलांची आज्ञा मिळताच पार्श्वकुमार मातेच्या सदनीं गेले वंदन करून त्यानीं युद्धासाठीं तिची अनुज्ञा मागितली. मातृसुलभ वात्सल्यामुळें क्षत्रियाणी असूनही वामादेवीच्या नेत्रांत अश्रु चमकू लागले. व पार्श्वकुमारानें वामादेवीस तिच्या कर्तव्याचें भान करून दिलें नसतें तर तिनें आपल्या अश्रूनीं त्यांना न्हाउच घातलें असतें.

पार्श्वकुमाराचा तो वीरोचित उत्साह जाणून तिनें त्याच्या कपाळीं कुंकुमतिलक लाविला. आशीर्वाद घेऊन त्यानीं वंदनपूर्वक मातेचा निरोप घेतला.

मातापित्यानीं आज्ञा दिल्यामुळें कुमाराचा उत्साह फारच वाढला- लावलाच्या मजला मारीत सैन्यासह ते कुशस्थलीसमीपच्या जंगलांत शिरले आणि मोठ्या शिताफीनें त्यानीं कलिंग सेनेला वेढलें.

अशा प्रकारें पार्श्वकुमारानीं अचानक वेढल्याचें समजताच यवनराज घाबरला. वैयक्तिक विषयलालसेच्या पूर्तीसाठीं असंख्य वीरांचें बलिदान व्हावें ह्याचें कुमाराना वैषम्य वाटलें. अन्याय व जुल्माना प्रतिकार झाला नाहीं तर प्राणिमात्राची सुखशांति धोक्यात येईल हें ते जाणून होते. म्हणून शक्यतोंवर रक्तपात न होता हें प्रकरण मिटविता आलें तर पहावें या उद्देशानें त्यानीं आपला प्रतिनिधि राजनीतीप्रमाणें कलिंगाधिपतीकडे पाठविला. त्यास यवनराजानें मोठ्या सन्मानानें वागविलें.

छावणींतील एका प्रशस्त तंबूत उच्चासनीं यवनराज बसला असून बाजूला त्याचे मंत्री होते. एका प्रशस्त आसनावर वाराणसीचा प्रतिनिधि बसला होता. 'राजन्, राजकुमारीचा विवाह हा तिच्या इच्छेचा प्रश्न आहे. जोरजुलमानें तिच्याशीं लग्न करण्याचा प्रयत्न आपल्यासारख्या वीरश्रेष्ठाला शोभत नाहीं. आपल्या वैयक्तिक लालसेसाठीं शेकडों स्त्रिया विधवा बनत्यात, अनेक माता विह्वल व्हाव्यात आणि शेकडों वीरांचें रक्त सांडलें जावें हें योग्य नव्हे. आपण हा अविचार सोडून आपले परंपरागत संबंध कायम ठेवावेत अशी आमच्या महाराजांनीं इच्छा प्रकट केली आहे. नाहीं तर एरव्हीं स्त्रियांच्या अब्रूरक्षणासाठीं आमच्या तरवारी नेहमीं परजलेल्या असतात हें पूर्ण समजावें.' वाराणसीच्या प्रतिनिधीनें स्पष्ट शब्दांत बजावलें.

आवेशांत आला कीं मनुष्य विवेकाला तिलांजली देतो परंतु अभिनिवेश नाहींसा झाला म्हणजे अविचाराबद्दल तो पश्चात्ताप करतो. राजकन्या प्रभावतीच्या सौंदर्यानें यवनराज बेहोष झाल्यामुळें त्याला राजकन्ये शिवाय कांहीं सुचत नव्हतें. म्हणून त्यानें प्रसेनजिताकडे तिची मागणी घातली. पण प्रसेनजितानें त्यास नकार दिला. त्यामुळें चिडून जाऊन यवनराजानें कुशस्थळीवरही स्वारी केली होती. पार्श्वकुमाराच्या चरचरीत अंजनानें त्याच्या डोळ्यांवरील विषयाची धुंदी खाडकन् उतरली. वाराणसीच्या आणि कुशस्थळीच्या सैन्याच्या मध्यें आपला चकाचूर होण्यास वेळ लागणार नाहीं हें त्यानें ओळखलें. कारण पार्श्वकुमाराचा पराक्रम तो जाणून होता. त्याच्या मंत्र्यांनींही संधीचा हात स्वीकारण्याबद्दल सल्ला दिली. स्वतः कलिंगराज मंत्र्यासह कुमाराच्या छावणींत गेला. आपणास दुष्कृत्यापासून परावृत्त केल्याबद्दल त्यानें कुमाराचे आभार मानले आणि वेढा उठवून तो कलिंगला निघून गेला.

कुशस्थळीचा वेढा उठताच नगराचे दरवाजे उघडले गेले. आपल्या सर्व लवाजम्यासह प्रसेनजित राजा कुमाराचें स्वागत करण्यासाठीं त्याच्या छावणींत आला आणि त्यानें कुमारांना सैन्यासह मोठ्या सन्मानानें नगरांत नेलें. मोठा दरबार भरविला. तेव्हां वाराणसीकडून मिळालेल्या या अपूर्व मदतीविषयीं प्रसेनजित राजानें कृतज्ञता व्यक्त केली आणि वाहिवरून प्रेमभरानें कुमारास गाढ आलिंगन दिलें. नगरांत चोहींकडे

कुमारानीं दाखविलेल्या उदारतेचें, कर्तव्यनिष्ठा, शौर्य आणि समयज्ञता याचें गुणगान सुरू होतें. तें राजकन्या प्रभावतीच्या कानीं पडताच तिच्या हृदयमंदिरातही कुमाराचा प्रवेश झाला. कुमाराच्या पराक्रमाचें यशोगान ह्यापूर्वीच तिच्या कानावर अनेकदा पडल्यामुळें त्याच्याविषयीं तिच्या मनात अनुराग उत्पन्न झाला होता. त्यातच ह्या विजयप्रसंगाची भर पडल्यामुळें तिनें पार्श्वकुमाराशींच विवाह करण्याचा निर्धार केला व तो सर्वांकडून मातापित्याला कळविला. त्यामुळें त्या दरबारात राजकन्येचें पाणिग्रहण करण्याची राजानें कुमाराना विनंति केली. कुमार दचकले.

'राजन्, राजघराण्याची इभ्रत राखण्यासाठीं वडिलांच्या आज्ञेनें आपल्या हातेला ओ देऊन मी आलों. ह्या प्रलोभनानें मी निघालों नव्हतों.' कुमारानीं जबाब दिला.

'हें प्रलोभन नव्हे, कुमार. राजकन्येनें तसा निश्चय केला आहे. आणि म्हणूनच तिला पदरात घेण्याची आपणास विनंति केली आहे.' राजा बोलला.

राजाचा हा खुलासा ऐकून कुमार निरुत्तर झाले. त्यानीं राजा प्रसेनजिताचा निरोप घेतला आणि दरबार संपला. विजयी पार्श्वकुमारानीं वाराणसींत प्रवेश केला. आपल्या आवडत्या कुमाराचें स्वागत करण्यासाठीं प्रजा अत्यंत उत्सुक झालेली होती. सर्व नगर चित्रविचित्र ध्वजापताकानीं सुशोभित करण्यात आलें होतें. सडासंमार्जन करुन सुवासिनी आरत्या घेऊन उभ्या होत्या. धीर व गंभीरपणें कुमारानीं नगरात प्रवेश केला. कुमारिका आणि सुवासिनींनीं कुंकुमतिलकानें कुमाराचें कपाळ सुशोभित केलें. वृद्ध स्त्रियानीं बोटाचा कडका मोडून कुमाराची दृष्ट काढली. कुमारानीं माता-पित्याच्या चरणीं मस्तक नमविलें, त्यानाही कृतकृत्य झाल्यासारखें वाटलें. रक्ताचा एकही थेंब न सांडता विजय प्राप्त करणाऱ्या त्या वीरपुत्राला जन्म दिल्याच्या मातेच्या आनंदाचें कोण बरें वर्णन करू शकेल !

थोड्याच दिवसानीं कुशस्थळींहून प्रसेनजित राजा प्रभावतीसह वाराणसींत आला. त्यानें प्रभावतीचा निर्धार राजा अश्वसेन व वामादेवी याना कळविला. वामादेवीला सून म्हणून प्रभावती फार आवडली. कुमाराचा स्वाभाविक कल निवृत्तिमार्गाकडेच होता. तरीसुद्धा कुमाराचें मन वळविण्याचा त्यानीं बराच प्रयत्न केला. मातापित्याच्या विशेष आग्रहाला मान

देऊन कुमारांनी लग्नास संमति दिली. इ. स. पूर्वी ८५७ त राजघराण्यास साजेशा दरबारी थाटानें पार्श्वकुमाराचा राजकन्या प्रभावतीशीं विवाह लावण्यात आला.

## ३

एकदा राजवाड्याच्या मनोऱ्यावरून पार्श्वकुमार नगरशोभा पहात होते. जगातील वैचित्र्य व प्राणिमात्राची सुखासाठीं चाललेली धडपड ह्याचा त्यांच्या मनात विचार चालला होता. स्वार्थ, कपट, इंद्रियलोलुपता इत्यादिकांच्या जाळ्यात स्वतःला गुरफटून घेऊन प्राणी आत्मघात करून घेतो. ह्या मोहपाशातून सुटण्याचा मार्ग प्राचीन मुमुक्षूंनीं अवलंबलेला आहे. तो प्राप्त करण्यासाठीं ह्या सुखोपभोगापासून अलिप्त व्हावें, त्या मार्गाचें स्वानुभवानें संशोधन करून आपण जगाला मार्गदर्शक व्हावें, असे विचारतरंग त्यांच्या हृदयसागरात उसळत होते. परमशांतीच्या या मार्गांत विकृति शिरल्यामुळें भेसूर बनलेल्या धर्माचें चित्र डोळ्यापुढें येताच त्यांच्या अंगावर शहारे आले.

वाराणसीसमीपच्या जंगलात एक तपस्वी होता. त्याच्या तपस्तेजाविषयीं नगरात अनेक आख्यायिका पसरल्या होत्या. त्यामुळें त्याच्या दर्शनास जाणाऱ्यांची संख्या दिवसेंदिवस सारखी वाढत होती. आज राजरस्त्यावरील दर्शनोत्सुक लोकांचा कोलाहल जास्त वाढलेला असल्यामुळें पार्श्वकुमाराचें लक्ष तिकडे वेधलें गेलें. चौकातून स्त्रीपुरुषांची सारखी रीघ लागली होती. निरनिराळ्या वस्त्रप्रावरणांनीं अलंकृत झालेले, नैवेद्य व पूजासामग्री घेऊन हजारों स्त्रीपुरुषांचा हा जनसमूह कोठें निघाला ह्याचें पार्श्वकुमारांना कोडें पडलें. त्यांनीं आपल्या सेवकास तपासासाठीं पाठविलें.

'गावाच्या बाहेर कमठ तपस्वी आले आहेत. महाराज, त्यांच्याच दर्शनाला हे सर्व लोक निघाले आहेत.' नौकरानें येऊन सांगितलें.

तपस्वी हा शब्द ऐकताच त्यांच्या डोळ्यापुढें एका तेजस्वी शांत मूर्तीचें दृश्य उभें राहिलें.

तपस्वी म्हणजे जगाला सुखी करण्यात आपलें सर्व जीवन वेचणारे

महापुरुषच होत. त्याची वाणी अमृतापेक्षाही मधुर असून त्याची छायाही चंद्रापेक्षा शीतल भासणार असें त्यांना वाटलें.

'त्याच्या पदरजानें खरोखर कृतकृत्य झालें हें वाराणसी शहर.' कुमार मनाशींच बोलले. त्यांनीं घोडा मागविला आणि योगिराजाला पहाण्यासाठीं त्यावर स्वार होऊन अनुचरांसहित निघाले.

भर दुपारची वेळ होती. सूर्य आपल्या प्रखर किरणांनीं भूमितलाला दग्ध करीत होता. उत्साहातिरेकामुळें पार्श्वकुमारांना त्याचें कांहींच वाटलें नाहीं. अपार लोकसमूह तेथें उसळला होता. एका झाडाखालीं त्यांनीं घोडा थांबविला. आपण केलेल्या सर्व कल्पना फोल ठरलेल्या पाहून ते आश्चर्यानें चकितच झाले. कल्पवृक्ष म्हणून आश्रयाला जावें तों काटेरी वृक्ष निघावा, तहानेनें व्याकुळ झालेल्यास सरोवर दिसावें आणि तें मृगजळ ठरावें, तशींच राजकुमाराची स्थिति झाली.

अगाला राख फासलेला एक वृद्ध तपस्वी व्याघ्रचर्मावर बसलेला होता. त्याच्या चोहोंबाजूंना अग्नि धडधडत असून वरून पडणारीं सूर्याचीं प्रखर किरणें तो तपस्वी सहन करीत होता. त्याचे लालबुंद डोळे मंगळाप्रमाणें लुक-लुकत होते. उत्तमोत्तम पक्वान्नांनीं व फळांनीं भरलेलीं ताटें नैवेद्य म्हणून भक्तजन त्याच्या चरणीं समर्पण करीत होते. तपस्व्याच्या चमत्कारांच्या अनेक दंतकथा भक्तसमूहांत पसरलेल्या होत्या. तापस कमठाची अहं-कारानें ताठर बनलेली नजर भक्तजनाकडे तुच्छतेनें वळली होती. लोकांची कमठावर पूर्ण श्रद्धा बसली होती. कुमार तेथें आल्याबरोबर लोकांनीं त्यांचा जयजयकार केला. त्याबरोबरच तपस्व्याच्या नांवाचाही जयध्वनि लोकांत दुमदुमला.

तपस्व्यानें आपली अहंकारपूर्ण नजर राजकुमारावर टाकली. कुमारांनीं श्रोत्यावरूनच अभिमानानें जमलेल्या लोकसमूहामधून नजर फिरविली. धर्मकल्पनेची ही विटंबनाच होय असें त्यांस वाटलें. ह्या कष्टमय प्रकाराला धर्म म्हणायला त्यांचें मन तयार होईना. तपस्व्याची नजर त्यांच्याकडे वळली. मिश्किलपणानें हसणारे त्यांचे डोळे तपस्व्यानें ओळखले. राज-कुमाराचा उद्धटपणा त्यास असह्य वाटला. रोषानें त्याचा चेहरा उग्र

बनला. डोळ्यातून अग्नीच्या ठिणग्याच उडताहेत की काय असें वाटलें. क्रोधाग्नीमुळे त्याची मुद्रा अधिकच भेसूर दिसली.

'राजा धर्मरहित असला तर प्रजाही अधर्मी बनते नाहीं ?' व्यंगोक्तीने तपस्वी राजकुमाराना ऐकूं जाईल एवढ्या मोठ्यानें बोलला. लोकाच्या चेहऱ्यावरही राजकुमाराच्या उद्धटपणाबद्दल तीव्र नापसतीचा भाव उमटला होता.

'धर्म आणि अधर्म कशाला म्हणावा तोच तर मोठा प्रश्न आहे, तपस्वीजी.' घोडा पुढें आणीत कुमार बोलले.

'शरीरशोषण म्हणजेच तपश्चर्या. तपश्चर्या करणें हाच धर्म आहे. साठ साठ हजार वर्षे तपश्चर्या करणारे विश्वामित्रासारखे मुनि होऊन गेले आहेत.' तपस्वी बोलला.

'तपाचा उद्देश ?' कुमारांनीं प्रश्न केला.

'स्वर्गसुख आणि मोक्षप्राप्ति.' तपस्व्यानें उत्तर केलें.

'केवळ शरीरशोषणानें मोक्षप्राप्ति अथवा स्वर्गसुख कसें प्राप्त होईल ? तापसराज, अन्नासाठीं तडफडणारे शेकडों प्राणी काय स्वर्गाला जातील ? समुद्रात बुडून अथवा वणव्यात होरपळून निघणारे अगणित प्राणी काय ह्या उच्चस्थानीं पोहोंचतील ? केवळ कायक्लेश हा कधींच धर्म बनू शकत नाहीं.' कुमार शांतपणें बोलले.

'वा ! धर्म जाणण्याचा मोठा आव आणला आहेस की ! राजविलासात निमग्न राहणाऱ्यांनींही तपश्चर्येच्या आणि धर्माच्या गोष्टी माझ्यासारख्याला शिकवाव्यात अं ?'

योग्याच्या या स्पष्टोक्तीनें जनतेचा त्याच्याविषयींचा आदर द्विगुणित झाला. त्यांनीं पार्श्वकुमाराकडे उपेक्षित नजरेनें पाहिलें.

'स्वर्गलोकातील सुखाच्या प्राप्तीसाठीं जर हें तप आणि शरीरशोषण आहे तर इहलोकीं ऐषारामात लोळणारे मोठमोठे लक्ष्मीपुत्र आणि राजेरजवाडे याना त्याची काहींच आवश्यकता नाहीं ना ?' पार्श्वकुमारांनीं मार्मिक सवाल टाकला.

तपस्वी घोटाळला, निरुत्तर झाला आणि चिडला.

'जगाच्या आदिकालापासून आमचे महान् ऋषिमहर्षि सांगत आले आहेत तें का खोटें आहे ? तुझ्या नास्तिकतेची अगदीं सीमा झाली. कुमार, असल्या नास्तिकतेमुळेंच जग दु:खी झालें आहे. धर्म सांगण्याचा हा अव्यापारेषु व्यापार सोड.' जिवत चालल्या अग्नीवर फुंकर टाकीत कमठ बोलला. त्यावेळेस त्याच्या मनातील आग भडकत होती. लोका नाही पार्श्वकुमाराचा संताप आला होता. राजकुमार असल्यामुळेंच थोडी मर्यादा ठेवली होती. नाही तर जनसमुदायानें त्याची दुर्दशाच केली असती

'प्राचीन महर्षि मूर्ख नव्हेत. त्यांनी सांगितलेलें क्रियाकांडही खोटें नाहीं. परंतु त्यांतील मर्मच नेमकें आम्हीं गाळलें आहे क्रियेच्या जोडीला ज्ञान हें अत्यावश्यक आहे. क्रियारहित ज्ञान पांगळें आहे. तर ज्ञानरहित क्रिया आंधळी आहे. अज्ञानानें केलेल्या कायाक्लेशानें आम्ही मानवजीवन व्यर्थ गमावतों हें समजलें पाहिजे.

तप म्हणजे इच्छानिरोध ह्याचे बाह्य आणि अभ्यंतर असे दोन प्रकार पडतील बाह्य तप म्हणजे इंद्रियांचें दमन करणें आणि अभ्यंतर तप म्हणजे मन संयमन व आत्मविकास करणें हें होय. बाह्य तप आणि अभ्यंतर तप हीं परस्परावर अवलंबून असतात लोण्याचा गोळा जराही आच लागताच जसा विरघळतो तसें विषयाचें नुसतें स्मरण झाल्याने इंद्रियें भडकतात आणि मार्गभ्रष्ट होतात. इंद्रियांना आत्मविकासाला सहायक बनविणें हाच बाह्य तपाचा मुख्य उद्देश असतो. त्यासाठीं इंद्रियदमन हा एकच उपाय आहे. इंद्रियांचें संयमन हें साध्य नसून आत्मजागृति करण्याचें तें साधन आहे. इंद्रियदमन होऊ शकलें कीं मन स्थिरता प्राप्त करणें आवश्यक असतें. ती अभ्यंतर तपानें होते मन स्थिरतेनें दृष्टि अंतर्मुख बनते. अंतर्मुख दृष्टि आत्मसंशोधन करते व हृदयाची मलिनता नाहींशी करते. त्यामुळें द्वेष, दुराग्रह, मिथ्या दृष्टि, क्रोध, मान, माया, लोभ आणि मोह वगैरेंचा क्षय होऊन सम्यग्दृष्टि प्राप्त होते आणि आत्मचिंतनात चित्त स्थिर होऊन एकाग्रता वाढते. आत्मविकास जोंपर्यंत होत नाहीं तोंपर्यंत कितीही उग्र तपश्चर्या केली तरी ती सर्व व्यर्थ आहे.

शरीर आणि आत्मा भिन्न आहेत. शरीर हें नश्वर आहे आणि आत्मा अमर आहे. आत्मज्ञान बाजूला सारून केलेलें शरीराचें पोषण आणि शोषण

व्यर्थ आहे; कारण शरीर हें साधन आहे, साध्य नव्हे. शरीरशुद्धीसाठीं तपादि क्रिया आणि आत्मविकासासाठीं ज्ञान अशी ही जोडी आहे. ज्ञान-युक्त तपश्चर्येनें शरीरशुद्धि होऊन मनोबल वाढतें आणि मनोबल वाढलें म्हणजे वृत्ति अंतर्मुख होते व आत्म्याच्या निराट स्वरूपांत विराम पावते. यालाच आत्मानंद म्हणतात. त्याचें वर्णन पुढें वाणीनें होऊं शकत नाहीं. त्याच वेळीं दिव्य ज्ञानाची प्राप्ति होते. या कैवल्यज्ञानप्राप्तीनंतर ज्ञानौघ सारखा वाहूं लागतो. सर्वसामान्य लोक तिला प्रासादिक वाणी म्हणतात. असा तपस्वीच उग्र तपाचा खरा अधिकारी असतो, कारण आत्मसुखांत तो लीन असल्यानें देहाविषयीं त्याला यत्किंचितही आसक्ति नसते. आणि कायक्लेशाचें त्यास महत्त्वही वाटत नाहीं. त्याच्याशिवाय इतरांनीं केलेलें असलें अज्ञान तप म्हणजे धर्माचें विडंबनच होय पार्श्वकुमारांनीं तपश्चर्येचा उद्देश स्पष्ट शब्दांत सांगितला.

कुमाराच्या मुखावर अपूर्व तेज झळकत होतें. जनसमूह मुग्ध बनला होता. त्यांना आपल्या युवराजाविषयीं अभिमान वाटला. पार्श्वकुमाराच्या जयजयकाराची गगनभेदी गर्जना अंतराळांत उसळली.

तपस्व्याला पार्श्वकुमाराचें म्हणणें अमान्य नव्हतें. परंतु त्याला मानापमानाचा मोह आवरेना. आपल्या भक्तांसमोर झालेला अपमान त्याला कोठून सहन होणार ? क्रोध अनावर झाल्यामुळें तो थरथर कांपूं लागला.

'राज्यलोभानें अनेक निर्दोष माणसांचे खून पाडणाऱ्यांनीं धर्माचा उपदेश करावा ! वाहवा ! खासा न्याय ! कसाबानें धर्म शिकवावा असेंच नाहीं का होत हें ?' दुसरें, एक चंदनाचें खोड हातीं घेत तपस्वी बोलला. लोकांना तें म्हणणें काहींसें पटल्यासारखें दिसलें

'तृष्णा आणि इंद्रियलोलुपता ही क्षत्रिय असो कीं संन्याशी दोघांनाही सारखीच मारक आहे. परंतु अन्याय्य आक्रमणाला नाहींसें करण्यासाठीं केलेलें युद्ध धर्मच आहे. असल्या युद्धांत अनेकांचा संहार होतो ही गोष्ट खरी आहे, परंतु हा संहार नसून जगाच्या कल्याणासाठीं स्वेच्छेनें केलेलें बलिदान आहे. जनताजनार्दनाची प्राणसहित सर्वस्व अर्पण करून केलेली ही पूजा आहे. तपस्वीराज, निष्काम कर्मवीराची ही अपूर्व तपश्चर्या आहे.' कुमारांनीं समर्पक उत्तर दिलें.'

'कोणत्या धर्माची आम्ही विटंबना करतों ?' कुमारांचें म्हणणें योग्य अर्थानें घेण्याऐवजीं रागानें बेभान झालेल्या कमठ तापसानें विलंडवादाला आरंभ केला. एक चंदनाचें ओंड त्यानें अग्नींत लपवलें.

ह्या चंदनाच्या ओंडानेंच त्याचा निर्णय दिला. कुमारांनीं आपल्या सेवकाकडून तें जळतें ओंड बाहेर काढविलें आणि जपून त्याचे दोन भाग करविले. तों त्यांतून एक भुजंग निघाला. जीव कासावीस झाल्यामुळें तो सारखा तडफडत होता. शेवटची घटका मोजणाऱ्या त्या दुर्दैवी प्राण्याला कुमारानें नवकारमंत्र ऐकविला. मंत्रश्रवणाच्या त्या पवित्र वातावरणात तो सर्प तन्मय झाला. शांतपणानें त्याचें प्राणोत्क्रमण झालें. कुमारानीं एक दीर्घ निश्वास सोडला.

'धर्माच्या नांवावर अशा कितीतरी प्राण्यांचें निष्कारण बलिदान होत असेल ! अशा प्रमादाचरणानें का कधीं मोक्ष मिळेल ?' असें म्हणून दुःखित अंतःकरणानें कुमार परतले.

अगोदरच युवराजाच्या अपूर्व ज्ञानानें लोकसमूह आकर्षित झालेला होता. त्यानंच सर्पकरणाची भर पडली. कुमाराविषयीं त्यांच्या मनांतील पूज्यभाव वृद्धिंगत झाला. त्यामुळें त्यांची पूजा करण्यासाठीं ते जमले होते त्याच तपस्व्याची विटंबना करून ते निघून गेले

तपस्वी क्रोधानें बेभान झाला होता. अपमानाचें शल्य त्याच्या अंतःकरणांत वज्रलेप होऊन बसलें आणि सूडाची न विझणारी ज्वाला त्याच्या अंतरंगांत भडकली. काहीं कालानंतर सूडाच्या तीव्र भावनेंत त्याचें प्राणोत्क्रमण झालें.

४

पार्श्वकुमारांना राज्याभिषेक करण्याची आपली इच्छा दरबारांत राजा अश्वसेनानें सभ्यापुढें प्रकट केली. सर्वांनीं त्याला संमति दिली. राजानें कुमारांना बोलावून आपली इच्छा कळविली. परंतु कुमार मौनच राहिले. राजानें पुन्हा विचारलें तेव्हां त्यांनीं उत्तर दिलें, 'तात, हें राज्य घेऊन मी काय करूं ? भोग आणि विलासांच्या प्राप्तीनें मनुष्याची तृप्ति कधींच झाली नाहीं. आणि म्हणून ह्यापासून मी दूर राहूं इच्छितों.'

'पण बेटा, राज्यावर आरूढ होऊनही लोकाचें कल्याण करता येत नाहीं का?' अश्वसेनानें विचारलें.

'आपण म्हणता तें खरें आहे, परतु तें राज्यापुरतेच, आणि ते फक्त ऐहिक. पण त्यामुळें माझें कार्यक्षेत्र सकुचित बनतें आणि सत्यमार्गाच्या प्रसारात मोठी अडचण येते. अपवाद जर सोडले तर सर्व जनता ह्या साधनानीं विषयलोलुपच बनते. त्याचा त्याग न करता जनतेला सत्यधर्म कसा दाखविता येईल? राज्याची जबाबदारी कोणीही घेईल परतु धर्मात शिरलेली निवृत्ति घालविण्यासाठीं कोण बरें पुढें येईल? माझा अतर्नाद मला त्यासाठींच बोलावितो आहे. पिताजी, सारें विश्व माझें कुटुब आहे. आणि मला राजवैभवाचा वीट आला आहे' कुमारानीं नम्रपणें पण निश्चित स्वरात सागितलें.

राजानें कुमाराची मन स्थिति ओळखून ती चर्चा तेथेंच थाबविली

एकदा वसतोत्सवानिमित्त पार्श्वकुमार राजोद्यानात गेले. निसर्गदेवता सुदर वस्त्रें परिधान करून बसली होती कोकिळा कुऊ कुऊ आवाजानें वसताचे स्वागतगीत गात होत्या मद मद वायुलहरी त्याला सुस्वराची साथ देत होत्या लता आनदानें डोलत होत्या. फुलें हसत होतीं परतु पार्श्वकुमाराना त्यात काहींच आनद वाटला नाहीं मनुष्याच्या विचारलहरी नेहमीं हृदयाच्या तारेवर छेडल्या जातात हेंच खरें

'इतकी हसरी वनश्री, पण ही सुद्धा कोमेजणार ना? काळाच्या कराल दाढेंतून कोण बरें सुटणार आहे? जीवनाचें सार्थक करण्यासाठीं वैराग्य रगात मग्न होत चालल्ेल्या पार्श्वकुमारानीं अशा प्रकारच्या विचारात मग्न असतानाच उद्यानातील महालात प्रवेश केला. त्याचें चित्त जास्त अस्वस्थ झालें म्हणून ते एका आसनावर बसले. समोरच्या भिंतीकडे त्याचें लक्ष गेलें भगवान् श्रीनेमिनाथ आणि महासती राजिमतीचें तें चित्र होतें. त्या चित्राकडे एकाग्रतेनें त्यानीं पाहिलें आणि त्यात ते अगदीं तन्मय झाले.

भगवान् नेमिनाथ राजिमती याचें जीवन त्याच्या डोळ्यापुढें चल-चित्रपटाप्रमाणें उभें राहिलें.

भगवान् श्रीनेमिनाथ हे यादववशातील समुद्रविजय महाराजाचे पुत्र आणि श्रीकृष्णाचे चुलत भाऊ होते. शौरीपुरीला त्याचें राज्य होतें कस-

वधानंतर जरासंधाच्या त्रासानें यादवांनीं द्वारका नगरी वसविली. नेमिनाथ हे लहानपणापासून अत्यंत बलवान् व पराक्रमी होते. मथुरेच्या उग्रसेन राजाच्या मुलीशीं त्यांचें लग्न ठरलें. मोठ्या ल्याजम्यासह वऱ्हाडही निघालें. सर्व व्यवस्था श्रीकृष्ण जातीनें पहात होते. वऱ्हाड मथुरेच्या सीमेवर पोहोंचलें. नेमिनाथाचा रथ गावानजिक आला. इतक्यात पशूंचे आक्रंदन त्यांनीं ऐकलें. एका घशाळेंत असंख्य पशुपक्षी कोंडलेले त्यांनीं पाहिले. त्यांच्या आक्रंदनानें भगवान् श्रीनेमिनाथाचें हृदय द्रवलें.

'कशासाठीं हे पशु जमविले आहेत येथें ?' श्रीनेमिनाथांनीं सारथ्याला विचारलें

'आपल्या लग्नाच्या मेजवानीसाठीं.' हसत हसत सारथी बोलला. नेमिनाथाच्या हृदयावर तीव्र आघात झाला. 'मला असलें लग्न करावयाचें नाहीं' असें म्हणून त्या मूक प्राण्यांची त्यांनीं सुटका करविली आणि रथ तसाच मागें परतविला लोकांनीं समजाविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला परंतु व्यर्थ. समाराच्या बाह्य सौंदर्यावरून त्यांचें मन उडालें. राजिमतीला हे कळलें रथ मागें फिरलेला पहाताच ती मूर्छित पडली. शुद्धीवर आल्यानंतर तिनें एकच आक्रान्त केला मातापितांनीं समजाविण्यासाठीं पुष्कळ प्रयत्न केला त्यावर राजिमती धरारीपणानें बोलली, 'पिताजी, ज्या दिवशीं नेमिकुमाराचा माझा वाङ्‌निश्चय झाला त्याच दिवशीं माझें खरें लग्नही झालें. हा समारंभ केवळ लोकरीतीसाठीं आहे त्यांचेच पावलावर पाऊल टाकण्याचा पत्नीधर्म मी पार पाडणार आहें' असें म्हणून सती राजिमतीनेंही घर सोडलें आणि रैवतक पर्वतावर घनघोर तपश्चर्या करणाऱ्या नेमिनाथांकडे ती गेली. केवलज्ञानाच्या द्वारा जगाच्या सत्य स्वरूपाचा नेमिनाथांना साक्षात्कार झाला होता त्यांच्या हस्तें राजिमतीनें भागवती दीक्षा ग्रहण केली जगात ज्ञानाचा प्रकाश आपल्या प्रासादिक वाणीनें पसरवीत भ. नेमिनाथ गिरनार पर्वतावर गेले आणि शुक्लध्यानात तन्मय होऊन त्यांनीं निर्वाणपद प्राप्त केलें.

हा जीवनचरित्रात तन्मय झालेल्या पार्श्वनाथांना भगवान् नेमिनाथाचा आदर्श फारच आवडला केवलज्ञानाच्या प्राप्तीसाठी त्यांनींही दीक्षा घेण्याचा निश्चय केला.

मातापितरांना त्यांनीं आपला निश्चय कळविला. त्यांनीं कुमाराला

समजविण्याचा आटोकाट प्रयत्न केला. परंतु शेवटीं कुमारानींच सर्व कौटुंबिक जनाची समजूत घातली. सतत एक वर्षपर्यंत तीर्थंकरपदाला शोभेल असें जगांत दान देऊन त्यानीं आपल्या भावी जीवनाची मुहूर्तमेढ रोविली.

भर तारुण्यात पार्श्वकुमार राजसमृद्धि सोडून स्वपरकल्याणासाठीं घराबाहेर पडले. त्यानीं स्वहस्तेंच केशलुंचन केलें. तें दृश्य पाहून त्याच्याबावरील प्रेमामुळें त्याचीं मातापिता, पत्नी, आप्तेष्ट आणि प्रजाजनांच्या डोळ्यातून अश्रूंच्या धारा वाहू लागल्या. इ. स. पूर्वी ८४७ त सर्व मायापाश तोडून त्यानीं संन्यासदीक्षा घेतली. त्याच वेळीं त्याना मनःपर्यवज्ञान उत्पन्न झालें. त्याच्याबरोबर इतर ३०० राजानींही दीक्षा घेतली. हा दीक्षासमारंभ फारच थाटानें साजरा झाला.

५

श्रीपार्श्वनाथ हे मति, श्रुत, अवधि आणि मन पर्यव ह्या चार प्रकारच्या ज्ञानानीं युक्त असूनही जगाला उपदेश देण्याच्या खटपटींत पडले नाहींत. त्यानीं एका साधकाची भूमिका घेतली जोंपर्यंत केवलज्ञान प्राप्त केलें नाहीं तोंपर्यंत जगाला त्यानीं उपदेश केला नाहीं. पूर्ण आत्मविकासानंतर स्वभावत स्फूर्तीनें वाहणारा ज्ञानौघ अज्ञानमय विकृतीला वाहून नेण्यात समर्थ असतो उपदेशकाच्या आत्मसामर्थ्यावरच जगाच्या हिताहिताचें प्रमाण अवलंबून असतें. जगाचें हित साधण्याची भावना दोन प्रकारची असू शकते. एकींत जगाच्या कल्याणाची खरी तळमळ असते. आणि त्यासाठीं साधक प्रथम अंत:शुद्धि करून पूर्ण आत्मविकास साधतो आणि केवलज्ञानप्राप्तीनंतर जगाच्या कल्याणाकडे वळतो. अशा साधकानाच अवतारी पुरुष म्हणतात. कारण त्याच्या निर्दोष वाणींतून सहज स्रवणाऱ्या उपदेशानें जगात सुख, शांति आणि पवित्रता नांदते. दुसऱ्या प्रकारच्या लोकात प्रसिद्धीची आणि मोठेपणाचीच हाव असल्यामुळें फक्त विद्वत्ता प्राप्त करून तिच्या योगानें जनतेवर आपलें वर्चस्व ठेवण्यासाठीं ते सारखे झटत असतात. त्याच्या कोरड्या पांडित्याला केव्हा केव्हा जग भुलतें. परंतु त्यानें जगाचें हित मात्र कधींच होत नाहीं.

होती. आपल्या संपूर्ण ज्ञानानें जगासाठीं दिनरात्रीं असा मार्ग त्यांनीं खुला केला. दीन, दुःखी अशा जीवमात्राला शान्तता आणि समाधान देणाऱ्या परमकल्याणकारी मार्गांचा उपदेश देत ते काशी, कौशल, पंचाल, मगध, माळव, अवंती, महाराष्ट्र, अंग, वंग, कलिंगादि सर्व देशांत ते हिंडले. अशा प्रकारें अखिल भरतखंडांत सत्यमार्गाचा त्यांनीं प्रसार केला.

विहार करीत करीत ही महान् विभूति वाराणसी नगराबाहेरील उद्यानात आली. अशोक वृक्षाच्या खालीं एका दिव्य आसनावर ती तेजस्वी मूर्ति विराजमान झाली होती. चेहऱ्यावर सूर्यासारखें तेज चमकत होतें. चंद्राची शीतलता चोहोंकडे फैलावत होती. सुभामोवतीं तेजाचें एक वलय पसरलेलें दिसत होतें. स्त्रीपुरुषच नव्हे तर प्राणिमात्र प्रभूंच्या मुखांतून बाहेर पडणारी मुक्ताफळें वेंचण्यास आतुर झाले होते. त्या पवित्र वातावरणात दर्प द्वेषाचें लेशमात्रही अस्तित्व दिसत नव्हतें.

'हे भव्य जीवांनो! जगाचें सत्यस्वरूप जाणण्यासाठीं अंतर्दृष्टि प्राप्त करा. जगाचें वैचित्र्य किंवा जडाचें मायाजाळ ह्यांत फसूं नका. सुस्त बनूं नका. उत्पाद, व्यय आणि ध्रुव ह्या तीनांवरच जगाची उभारणी आहे. आत्मा स्वतः ज्ञानी आहे, मुक्त आहे; परंतु कर्मजन्य आवरणानें त्याची अनन्तशक्ति दडपली गेली आहे. ह्या आवरणामुळेंच देव, मनुष्य, तिर्यंच, नारकी इत्यादि भेद पडतात. स्त्रीपुरुष अथवा उच्चनीचतेच्या भावना भासतात. म्हणून आत्म्याचें सत्य स्वरूप ओळखा. अज्ञान हेंच सर्व दुःखाचें मूळ आहे. ज्ञानाचा प्रकाश मिळवा. प्राणिमात्राच्या ठिकाणीं आत्मा ओळखा. मी आणि तू हा भेदभाव आत्म्याशीं ओळखतच नाहीं. धर्माशीं आत्मविकासाचा संबंध आहे. सर्व प्राणिमात्र धर्माचे अधिकारी आहेत. पौद्गलिक सुख कृमिकीटकही प्राप्त करतात; त्यासाठीं मानवदेह कशा असूं शकेल?

'इंद्रियजन्य सुखानें कधींहि तृप्ति होत नाहीं. त्याचा त्याग हेंच तृप्तीचें साधन जाणा. हे भव्य जीवांनो, हें समजा, विचार करा आणि आचरण करा.'

अशा प्रकारें भगवान् पार्श्वनाथाची विश्वहितकर वाणी जीवमात्राच्या आत्म्याला ज्ञानदीप होती, क्रियाजड बनत चाललेल्या मानवांना ज्ञानाचा

प्रकाश पोहचवीत होती. समता, विश्वबंधुत्व 'जगा आणि जगू द्या' चा अमोल संदेश पसरवीत होती. शेकडों कायक्लेशाच्या उग्र तपश्चर्या करणाऱ्या तपस्व्यांनीं शुद्ध मार्गाची दीक्षा घेतली.

त्यांच्या उपदेशाचा स्वीकार करून त्याप्रमाणे आचरण करणारे अनेक लोक निघाले. प्राचीन तीर्थंकराप्रमाणें साधु, साध्वी, श्रावक आणि श्राविका हे चार विभाग त्यांनीं पाडले. त्यांच्या आत्मविकासाच्या चढत्याउतरत्या श्रेणी ठरविल्या. त्यांच्या आचरणानेंच धर्माचें अस्तित्व रहाणार असल्यानें त्यास तीर्थ (तारणारें) ही संज्ञा दिली. अशा प्रकारें तीर्थाची स्थापना केली म्हणून त्यांना तीर्थंकर म्हणतात. रागद्वेषादि षड्रिपूंना जिंकणारे म्हणून लोक त्यांना जिन म्हणू लागले. त्यामुळें त्यांच्या अनुयायांना जैन म्हणतात. ह्या कालचक्रांत एकंदर चोवीस तीर्थंकार झाले असून त्यांत भगवान् पार्श्वनाथ हे तेविसावे होत. ज्यांच्या आदर्शावरून त्यांना आपला जीवनमार्ग निश्चित केला ते भगवान् नेमिनाथ बाविसावे तीर्थंकर होत.

स्वच्छंदी आचरण म्हणजे अध:पाताला आमंत्रण होय हें जाणून त्यांनीं चतुर्विध संघाचें आचरण आणि नियम निश्चित केले.

अहिंसा, सत्य, अस्तेय, अपरिग्रह हीं चार मुख्य व्रत सांगून जीवनासाठीं अनिवार्य असले अपवाद सोडून पूर्णांशानें त्यांचें पालन करणें साधु आणि साध्वींसाठीं आवश्यक ठरविलें. त्यास पूरक असे इतरही कांहीं आचार सांगितले. त्यानंतर श्रावक आणि श्राविका या दोन संघांना जीवन आणि व्यवहार ह्या दृष्टीनें अपवाद सोडून ह्याच व्रतांची आराधना सांगितली.

सुरवातीला पार्श्वनाथाच्या शिष्यसमुदायात (१) आर्यदत्तस्वामी, (२) आर्यघोषस्वामी, (३) विशिष्टस्वामी, (४) ब्रह्मस्वामी, (५) सोमस्वामी, (६) श्रीधरस्वामी, (७) वीरसेनस्वामी, (८) भद्रयशस्वामी, (९) जयस्वामी, (१०) विजयस्वामी हे दहा मुनि श्रमणगणाचे मुख्य होते. म्हणून त्यास गणधर म्हणतात. हे तत्कालीन मोठे ज्ञानी आणि सर्व शास्त्रपारंगत विद्वान होते. 'उत्पादव्ययध्रौव्ययुक्त सत्' ह्या सूत्राधारें पार्श्वनाथांनीं सांगितलेला उपदेश विस्ताररूपानें समजविण्याचें महान् कार्य ह्यांनींच केलं. ह्या उपदेशात द्रव्यपर्यायरूपानें सर्व स्याद्वादाचें स्वरूप अन्तर्भूत होतें. इ. स. पूर्वी आठव्या शतकात पार्श्वनाथाचे अनुयायी

म्हणून १६ हजार साधु, ३८ हजार साध्वी, १ लाख ६४ हजार श्रावक आणि ३ लाख २७ हजार श्राविका होत्या असें जैन शास्त्रातून वर्णन आहे. त्यात ३५७ चौदापूर्वांचे ज्ञानी, १४००० अवधिज्ञानी, ७५० केवलज्ञानी अधून १००० वैक्रियलब्धिसंपन्न होते.

अशा प्रकारें ह्या शिष्यसमुदायांच्या द्वारा सत्यधर्माची ध्वजापताका चोहोंकडे फडकवीत सर्व आयुष्य जनकल्याणात वेंचणारा हा महापुरुष सम्मेतशिखर ह्या पर्वतावर आला. बाह्य गोष्टींचा त्याग करून त्यांनीं एका महिन्याची ध्यानसमाधि धारण केली. त्याच्याबरोबर इतर ३३ मुनीही शुक्लध्यानात निमग्न झाले. श्रावण शु॥ ८ ला भगवान् पार्श्वनाथ निर्वाण पावले.

भरतवर्षात जेव्हा क्रियाकांडाचें प्रस्थ विशेष माजून ज्ञानमार्ग लोपत चालला होता अशा वेळीं ज्ञानमार्गाची ज्योत प्रज्वलित करून शुष्क क्रियाकांड आणि कायक्लेशाला आत्मिक गुणविकासाच्या सन्मुख करण्याचें महान् कार्य त्यांनीं केलें.

प्राणिमात्राच्या ठिकाणीं असलेल्या आत्म्याची ओळख देऊन त्यांनीं विषमतेला फाटा देवविला. नानाप्रकारच्या बाह्य देवाना खुष करण्याच्या प्रयत्नात गढून गेलेल्या जनसमूहाला त्यांनीं आतील ईश्वराची ओळख पटवून दिली.

आत्मा हाच परमात्मा बनतो. ह्या निसर्गसिद्ध तत्त्वप्रणालीला त्यांनीं अपूर्व चालना दिली.

> कमठे धरणेन्द्रे च स्वोचितं कर्म कुर्वती ।
> प्रभुस्तुल्यमनोवृत्तिः पार्श्वनाथः श्रियेस्तु वः ॥

## परिशिष्ट

# भगवान् पार्श्वनाथांच्या चरित्राबाबत जैन संप्रदायांतील ग्रंथांत असलेली मतांतरें

| दिगंबर | श्वेतांबर |
|---|---|
| १ इद्राने चकाकत असलेला पार्श्व पाहून हें नाव ठेविलें. | १ वामादेवीनें (पार्श्वं) समीप तार्ली सर्प फिरत असलेला पाहून हें नाव ठेविलें. |
| २ कमठाचा जीव नरकातून निघून महिपालपूरचा राजा बनतो आणि मग पचाग्नि तपस्वी बनतो. | २ कमठाचा जीव नरकातून निघून एक ब्राह्मणपुत्र बनून नंतर पचाग्नि तपस्वी बनतो. |
| ३ पार्श्वनाथ लग्नच करीत नाहींत. | ३ पार्श्वनाथाचें राजा प्रसेनजिताची कन्या प्रभावती इच्याशीं लग्न होतें |
| ४ अग्नीतील सर्प धरणेंद्र आणि कमठ ज्योतिष्कदेव बनतो. | ४ सर्प पाताळात धरणेंद्र बनतो आणि कमठ मेघमाळी नामक असुर बनतो. |
| ५ ज्योतिष्कदेव उपसर्ग न करता प्रभूचें समोवसरण पाहूनच सन्मार्गी वळतो. | ५ मेघमाळी उपसर्गानंतर सुमार्गी लागतो. |
| ६ उपसर्ग त्याना काशीलाच होतात. | ६ उपसर्गानंतर भगवान् काशीस जातात. |
| ७ भगवान् मोक्षास गेले तेव्हा त्या जागीं इद्रानें स्तूप केला असा कांहींच उल्लेख नाहीं. | ७ अशा प्रकारचा उल्लेख आहे. |
| ८ गर्भावतरणतिथि वैशाख कृ. २. | ८ ग. ति. चैत्र कृ. ४. |
| ९ जन्म पौष कृ. ११. | ९ जन्म पौष कृ. १०. |

| | |
|---|---|
| १० दीक्षेच्या वेळीं भगवान् ज्या पालखींत बसले तिचें नाव विमला. | १० पालखीचें नाव विशाला. |
| ११ दीक्षेच्या वेळेपासून प्रभु नग्न होते | ११ भगवानांनीं देवदुष्य वस्त्र धारण केलें होतें. |
| १२ केवलज्ञानाची प्राप्ति दीक्षे नंतर चार महिन्यांनीं चैत्र कृष्ण चतुर्थीस | १२ केवलज्ञानाची प्राप्ति ८३ दिवसानंतर चैत्र कृष्ण चतुर्दशीला. |
| १३ निर्वाणतिथि श्रावण शुद्ध ७. | १३ निर्वाणतिथि श्रावण शुद्ध ८. |
| १४ तीर्थंकराची माता सोळा शुभ वस्तु गर्भधारणेनंतर पहाते. | १४ ती १४ शुभ वस्तु पहाते. |

टीप :— साधुमार्गी संप्रदाय पार्श्वनाथांना वैराग्य राजिमती-नेमिनाथाचे पाहून झाल्याचें न मानता भगवान् नेमिनाथांच्या जीवनाविषयी विचार न करता उपराम शास्त्रानें मानतो बाकी सर्व बाबतीत सर्व जैन ग्रंथांची एकवाक्यता आहे

# भगवान् पार्श्वनाथांबाबत ऐतिहासिक भूमिका

आसेतुहिमाचल भरतवर्षांत सर्वत्र विद्यमान असणारीं पार्श्वनाथाचीं अगणित मंदिरें आणि त्याचे चमत्कार यांविषयीं लोकांत पसरलेल्या दंतकथा त्याच्याविषयीं असलेला जनतेचा आदरच व्यक्त करीत आहेत. सर्वच जैनमंदिरांना पारसनाथाचें मंदिर म्हणण्याचा जैनेतरांचा वाक्प्रचार आणि बिहारांत भगवान् पार्श्वनाथाच्या पादस्पर्शानें पवित्र झालेल्या एका मोठ्या टेकडीला पारसनाथाचा पहाड हें शेकडों वर्षांपासून असलेलें नामाभिधान पार्श्वनाथाचें श्रेष्ठत्व व त्याचें ऐतिहासिकत्व सिद्ध करीत नाहीं काय ?

बंगालमध्यें अजूनपर्यंत पूर्ण शाकाहारी राहिलेली सराक जात स्वतःला पार्श्वनाथाचीच उपासक म्हणविते. तिची संख्या तेथें एक लाखाचे वर आहे. भगवान् पार्श्वनाथाच्या महात्म्याचा आणि ऐतिहासिकतेचा हा पुरावाच नव्हे काय ?

× × ×

भगवान् पार्श्वनाथानंतर अडीचशें वर्षांनीं भगवान् महावीरांनीं त्याच धर्मतत्त्वाचा पुनरोद्धार केला. त्या वेळीं पार्श्वनाथाच्या संघांतील प्रमुख आचार्य केशीस्वामी हयात होते. भगवान् महावीराचे पट्टशिष्य गणधर गौतमस्वामी यांच्याशीं त्यांची गांठ पडली. एकाच धर्माचे प्रचारक असतांना काल आणि परिस्थित्यनुरूप त्यांच्यांत थोडासा फरक होता. त्याबद्दल त्यांचीं प्रश्नोत्तरें झालीं. गौतमस्वामींनीं दिलेल्या समाधानकारक उत्तरामुळें आचार्य केशीस्वामी महावीरांच्या श्रमणसंघांत मिसळले. तीं प्रश्नोत्तरें म्हणजे बुद्धपूर्व जैनधर्माचें अस्तित्व व त्याचप्रमाणें पार्श्वनाथांना ऐतिहासिक प्रामाण्य देणारा पुरावा असल्यानें मुद्दाम थोडक्यांत येथें उद्धृत करूं—

आचार्य केशीस्वामी– भ. पार्श्वनाथांनीं अहिंसा, सत्य, अस्तेय आणि अपरिग्रह हीं चारच महाव्रतें सांगितलीं आणि भ. महावीर तर पांच सांगतात. असा फरक कां ?

गणधर गौतम — काळ आणि परिस्थिति लक्षात घेऊन भगवान् महावीरांनी चौथ्या महाव्रताचेच ब्रह्मचर्य आणि अपरिग्रह असे दोन विभाग केले त्यामुळें मूळ तत्त्वात काहींसुद्धा फरक होत नाहीं.

आ केशीस्वामी— भ. पार्श्वनाथ तर सचेलक होते मग भ. महावीर अचेलक का ?

ग. गौतम— वस्त्रत्याग किंवा वस्त्रस्वीकार ह्याबाबत काहींच मतभेद नाहीं. कारण लोकांच्या योग्य विश्वासासाठीं आणि संयमपालनासाठींच बाह्य वेषाचें प्रयोजन आहे. निश्चयाचे दृष्टीनें तर हीं सर्व साधनें कुचकामाचीं असून दर्शन, ज्ञान, चारित्र्य हींच मोक्षप्राप्तीचीं खरीं साधनें आहेत. नाहीं तर भगवान् पार्श्वनाथ आणि भगवान् महावीर ह्यांची प्रतिज्ञा सारखीच आहे

हा संवाद म्हणजे बुद्धपूर्व जैनधर्मीचे अस्तित्वाचा आणि भ. पार्श्वनाथाचे ऐतिहासिकतेचा मौलिक पुरावाच आहे.

× × ×

नवव्या शतकात होऊन गेलेल्या आचार्य अमितगतींनीं धर्मपरीक्षा ह्या नावाच्या ग्रंथात १८ व्या अध्यायात ६८ वा श्लोक असा दिला आहे—

रुष्टः श्रीवीरनाथस्य तपस्वी मौडिलायनः ।
शिष्य.श्री पार्श्वनाथस्य विदधे बुद्धदर्शनम् ॥

× × ×

जिस समय महात्मा बुद्ध उन पाच भिक्षुओंके साथ थे उस समय उन्होने बौद्धधर्मकी नींवारोपण नही किया था जैसे कि वे स्वय स्वीकार करते हैं । अत निःसन्देह उक्त भिक्षुगण जैन थे और उनके साथही महावीरने जीवन व्यतीत किया था जैसे कि सर भाण्डारकरभी म० बुद्धको एक समय जैन मुनि हुआ बतलाते हैं । —जै हि. मा. १ पृ ५.

× × ×

**शिलालेख**

ओरिसा प्रांतात उदयगिरीचें स्थान हत्तीगुंफेच्या शिलालेखामुळें सुप्रसिद्ध इ स. पूर्वी २१२ वर्षी सम्राट् खारवेलनें करविलेल्या शिल्परचनेंत

पार्श्वनाथाच्या अनेक मूर्ति असून त्याच्या जीवनातील सर्व प्रमुख घटना त्यानी त्यात अत्यंत चातुर्याने खोदविलेल्या आहेत.

—बंगाल, बिहार ओरिसा जैन स्मारक पृ. ८९.

× × ×

मथुरेच्या कंकालीटीलेच्या खोदकामात इ. स. पहिल्या शतकात बनलेल्या पार्श्वनाथाच्या अनेक मूर्ति उपलब्ध असून एक जैन स्तूपही सापडलेला आहे. त्याचा काळ पार्श्वनाथाच्या अगदी जवळचाच असल्याबद्दल बुल्हर, विन्सेंट स्मिथ प्रमुख पाश्चात्य इतिहासकारांचे मत आहे.

---

आधुनिक भारतीय विद्वानांचे अभिप्राय—

(१) सुप्रसिद्ध भारतीय विद्वान् डॉ. टी. के. लढ्ढू, बी.ए., पीएच्.डी., एम्. आर. ए. एस्., संस्कृत शिलालेखादि विषयाचे प्रोफेसर, क्वीन्स कॉलेज, बनारस, आपल्या बनारसच्या व्याख्यानात म्हणाले— यह प्रायः निश्चित है कि जैनमत बौद्धमतसे प्राचीन है और इसके संस्थापक चाहे पार्श्वनाथ हो चाहे कोई तीर्थंकर जो महावीरसे पहिले हुये हो.

—जैन लॉ. पृ. २२३.

× × ×

(२) प्रख्यात दार्शनिक विद्वान् साहित्याचार्य ला. कन्नोमलजी, एम्. ए., सेशन्स जज, धोलपूर, एका लेखात लिहितात— श्री. पार्श्वनाथजी जैनियों के तेइसवे तीर्थंकर है। इनका समय ईसासे ८०० वर्ष पूर्वका था।

× × ×

(३) हिन्दी विश्वकोशाचे संपादक श्री. नगेंद्रनाथ बसू, प्राच्यविद्या-महार्णव, सिद्धान्तवारिधि, शब्दरत्नाकर, हरिवंशपुराणाच्या प्रस्तावनेत लिहितात— जैनधर्म कितना प्राचीन है इसकी आलोचना करनेका यह स्थान नही है। तब इतना कह देनाहि बस होगा कि जैनसम्प्रदायके तेइसवे तीर्थंकर श्रीपार्श्वनाथस्वामी स्वीष्टाब्दसे ७७७ वर्ष पहले मोक्ष पधारे थे. —जैनधर्मविषयमें अजैन विद्वानों की सम्मतियाँ पृ. ५१.

× × ×

(४) एक लब्धकीर्ति बंगाली विद्वान् डॉ. विमलचरण लॉ, एम्. ए., पीएच्. डी., एफ्. आर. एस्. एस्., महावीराच्या पूर्वी जैन धर्माचा वैशालींतील प्रचार लिहिताना म्हणतात— "पार्श्वनाथजीद्वारा स्थापित हुये धर्म का प्रचार भारत के उत्तरपूर्वी क्षत्रियों में और खासकर वैशालीके निवासियों में था." —क्षत्रिय क्लॅन्स इन बुद्धिस्ट इण्डिया पृ. ८२.

× × ×

(५) दक्षिणभारतीय विद्वान् प्रो. रामस्वामी आयंगार, एम्. ए., लिहितात— 'भगवान् महावीर के निकटवर्ती पूर्वज पार्श्वनाथ थे जिनका जन्म ईसासे पहले ८७७में हुवा था। उनका मोक्षकाल इसासे पूर्व ७७७ में माना जाता है। —स्टडीज् इन् साउथ इण्डियन जैनिझम् भा. १ पृ. १२.

× × ×

(६) प्रसिद्ध राधास्वामी महर्षि श्री. शिवव्रतलालजी वर्मन्, एम्. ए., एल्एल् बी., ह्य पार्श्वनाथाचें अस्तित्व मान्य करून म्हणतात— 'जैनियोंमेंसे कोई पार्श्वनाथकी पूजा करते हैं, कोई महावीरकी। इन सबमें मतभेद बहुत कुछ नहीं। —जैन धर्मका महत्त्व पृ. १४.

× × ×

(७) डॉ वेणीमाधव बारुआ, डी. लिट्., हेही श्रीपार्श्वनाथजींना श्री-महावीराचे पुरोगामी तीर्थंकर म्हणून स्वीकारतात. —हिस्ट्री ऑफ दी प्रीबुद्धिस्टिक इण्डियन फिलॉसफी पृ. ३७७.

× × ×

(८) लोकमान्य बाळ गंगाधर टिळक— बौद्ध धर्माच्या स्थापनेपूर्वी जैन धर्माचा प्रसार होत चालला होता ही गोष्ट विश्वसनीय आहे. —केसरी ता. १३।१२।१९०४.

पाश्चात्य विद्वानांचे अभिप्राय—

(१) डॉ. हर्मन जेकोबी, एम्. ए.,पीएच्.डी. (बोन, जर्मनी), आपल्या जैन सूत्राज् च्या प्रस्तावनेंत म्हणतात— ...The Parshwa was a historical figure admitted by all as very probable.

—Jain Sutras S. B. E XLV Intro. P.XXI.

× × ×

(२) डॉ. जार्ल चारपेन्टियर, पीएच्. डी., उत्तराध्ययनसूत्राच्या प्रस्तावनेंत लिहितात—We ought also to remember both that the Jain religion is certainly older than Mahavira, his reputed predecessor Parshwa having almost certainly existed as a real person and that consequently the main points of the original doctrine may have been codified long before Mahavira.

—Uttaradhyayansutra, Intro. P.21.

× × ×

(३) सर पेट्रिक फैगन, के. सी. आय. ई., सी. एस. आय., एका धर्मसमेलनात म्हणाले होते कीं जैन तीर्थंकरापैकीं अंतिम दोन म. पार्श्वनाथ आणि म. महावीर निःसन्देह वास्तविक व्यक्ति आहेत कारण त्याचा उल्लेख अशा साहित्यग्रन्थातून येतो कीं जे ऐतिहासिक आहेत. — रिलिजन्स ऑफ दी एम्पायर पृ. २०३.

× × ×

(४) फ्रेंच संस्कृतज्ञ डॉ. गिरनॉट म्हणतात— "There can no longer be any doubt that Parshwa was a historical personage" —एसे ऑन दी जैन बिब्लॉग्राफी.

× × ×

(५) हॉर्म्सवर्थ हिस्ट्री ऑफ दी वर्ल्ड भा. २ पृ. ११९८— They (Jains) believe in a great number of prophets of their faith anterior to Natputta and pay special reverence to this last of these Parshva or Parshvanath. Herein they are correct in so far as the latter person-

ताजमहालनिर्माता शहाजहान व नूरजहान अमर झाली आहेत; पण शिल्पकलेंत अत्युच्च स्थान पटकावणाऱ्या आबूवरील जैन मंदिरांचे निर्माते वस्तुपाल, तेजपाल व विमलमंत्री अजून अंधःकारातच खितपत पडले आहेत!

जैन बंधूंनो, या सर्व श्रेष्ठ पुरुषांना त्यांच्या योग्य स्थानीं प्रस्थापित करणें हें आपलें कर्तव्य ठरत नाहीं काय? हें कर्तव्य करण्यासाठीं आम्ही वरील समिति नुकतीच स्थापिली आहे. समितीनें हातीं घेतलेलें कार्य मोठें आहे. तें एकट्याचें नाहीं. लेखकांनीं पुढें येऊन जैनसाहित्य निर्माण केलें पाहिजे. धनिकांनीं तें प्रकाशित होण्यासाठीं मदत केली पाहिजे. आम्हांस विश्वास वाटतो कीं समितीनें हातीं घेतलेल्या कार्यास जैन जनता उत्तेजन देईल.

## — कार्याची रूपरेषा —

(१) समितीतर्फे वर्षांतून दोन पुस्तकें मराठींत प्रकाशित करण्याचें ठरविलें आहे. दुसरें पुस्तक लवकरच प्रसिद्ध केलें जाईल.

(२) समितीस ५ रुपयांची देणगी देणारा गृहस्थ समितीचा आजीव **सभासद** मानला जाईल. त्यास समितीचें प्रत्येक **पुस्तक पाऊणपट** किंमतीस मिळेल.

(३) समितीस ५१ रु. देणगी देणारे गृहस्थ समितीचे **आश्रयदाते** समजले जातील व त्यांना प्रत्येक **पुस्तक फुकट** पाठविलें जाईल.

(४) कार्यकारी मंडळ आजीव सभासदांतून व आश्रयदात्यांतून निवडलें जाईल. तूर्त खालील गृहस्थांचें कार्यकारी मंडळ निवडलें आहे.

अध्यक्ष— **श्री. भोगीलाल रामचंद्र शहा, सोलापूर.**
उपाध्यक्ष— ,, **मणिलाल भोगीलाल शहा, अमळनेर.**
खजिनदार— ,, **शांतिलाल रामचंद्र आयड, चांदवड.**
मंत्री— ,, **शांतिलाल नेमचंद शहा, चांदवड.**
,, **रमणलाल दामोदरदास मेहता, मालेगांव.**

पत्रव्यवहाराचा पत्ता:— मंत्री, महाराष्ट्र जैन साहित्य प्रकाशन समिति
चांदवड (जि. नासिक)